मराठीचि बोल निके। परी अमृतातेंहि पैजा जिंके।



। महाराष्ट्रसाहित्यसेवकग्रंथमाला ।

पुष्प २ रें.

# भगवान् श्रीकृष्ण !

अथवा

## ( श्रीकृष्णाचें नितांत रम्य चरित्र ! )

लेखक

गंगाधर रामचंद्र साने, बी. ए.

सन १९२३.

किंमत १ रुपया.





। महाराष्ट्रसाहित्यसेवकग्रंथमाला ।

पुष्प २ रें.

# भगवान् श्रीकृष्ण !

अथवा

## ( श्रीकृष्णाचें नितांत रम्य चरित्र ! )

---

लेखक

**गंगाधर रामचंद्र साने,** बी. ए.

---

हें पुस्तक
पुणें येथें आर्यभूषण छापखान्यांत **अनंत विनायक पटवर्धन**
यांनीं छापिलें, व **गंगाधर रामचंद्र साने,** बी. ए., यांनीं
घ. नं. १२२ शुक्रवार पेठ, पुणें, येथें प्रसिद्ध केलें.

---



---

सन १९२३.

---

किंमत १ रु.

# भगवान् श्रीकृष्ण !



“ तें पापांचा अचळु फिटे । पुण्याची पहांट फुटे ।
जैं मूर्ति माझी प्रगटे । पंडुकुमरा ॥ ”

—ज्ञानेश्वरी (अ. ४. श्लोक ८. ओं. ५६.)

। अर्पणपत्रिका ।

# भगवन् कन्हय्यालाल !



आपल्याच कृपेनें तयार झालेली
ही वाग्वैजयंति

आपल्यावांचून अन्य कोणाच्या
गळां शोभणार ?

कन्हय्याचा बंदा—
गंगाधर.

# विद्वानांचे अभिप्राय.



रा. गं. रा. साने यांनीं लिहिलेलें "भगवान् श्रीकृष्ण" अथवा "श्री-कृष्णाचें नितान्त रम्य चरित्र" हें पुस्तक वाचून पाहिलें. पुस्तक खरोखरच रम्य झालें आहे असें मला वाटतें. श्रीकृष्णाचें चरित्र निरनिराळ्या दृष्टींनीं पाहण्यासारखें असून प्रत्येक पेहेलूनें त्याची महती अवर्णनीय आहे हें हिंदुस्थानच्या लोकांस सांगावयास नकोच. आज हजारों वर्षें अनेक साधु व अनेक कवि या चरित्राचा रसास्वाद घेऊन तें गात आले आहेत. त्यांतल्यात्यांत भक्तिरसाचें रम्य आणि निरतिशय अधिष्ठान अशा दृष्टीनें आमच्या महाराष्ट्रांतील संतकवींनीं तें आपआपल्या अमोल ग्रंथांतून गाइलें आहे. या संतकवींचे सुंदर व हृदय हाळवून सोडणारे निरनिराळे बोल आपल्या वाणींत ग्रथित करून रा. साने यांनीं याच भक्तिरसाधिष्ठानदृष्टीनें या पुस्तकांत हें चरित्र लिहिलें असल्यानें आमच्या महाराष्ट्रीय भगवद्भक्त आबालवृद्ध स्त्रीपुरुषजनतेस हें चरित्र आवडेल अशी मला खात्री वाटते.

पुणें, ता. २१।१।२३. **चिंतामण विनायक वैद्य.**



रा. रा. गंगाधर रामचंद्र साने, बी. ए. यांनीं लिहिलेल्या 'भगवान् श्रीकृष्ण' या आटपशीर व छोटेखानी पुस्तकाचे छापील 'फॉर्म' मीं वाचले. त्यापूर्वी त्यांनीं दिलेली हस्तलिखित प्रतही वाचून पाहिली होती. दोन्ही वेळच्या वाचनांवरून माझा प्रस्तुत पुस्तकाविषयीं फार चांगला ग्रह झाला हें लिहिण्यास मला आनंद वाटतो. मुलांमुलींच्या मनांवर सहजरीतीनें ज्यांच्या वाचनाच्या योगानें धार्मिक आणि नीतितत्त्वांचे संस्कार ठसतील अशा तऱ्हेच्या पुस्तकांच्या उणीवेचा प्रश्न अजूनही समाधानकारक रीतीनें सुट-

ल्याच्या मार्गास लागला आहे असें, तद्विषयक योग्य वाङ्मयाची मंद प्रगति पहातां कोणासही म्हणतां यावयाचें नाहीं. अशा प्रकारचीं पुस्तकें जितकीं अधिकाधिक निघतील तितकीं तीं हवींच आहेत. या दृष्टीनें रा. साने यांचें पुस्तक वाचून पहातां मला तें उपयुक्त व वाचनीय झाल्याचें आढळून आलें.

आबालवृद्ध, स्त्री, पुरुष कोणाही भारतीयास श्रीराम व श्रीकृष्ण यांच्या चरित्राइतकें प्रिय व मनास सात्त्विक स्फूर्ति देणारें दुसरें तें काय असणार ? श्रीमद्भगवद्गीतेच्या १० व्या–' विभूति-योगा ' च्या अध्यायांत खुद्द भगवंतांनींच ' रामःशस्त्रभृतामहम् ' आणि ' वृष्णीनां वासुदेवोऽस्मि' अशा रीतीनें आपल्या या दोन अवतारविषयक विभूतींचें वर्णन केलें आहे; आणि अर्जुनानेंही, अशा तऱ्हेच्या विभूतींचें वर्णन करण्याविषयीं श्रीकृष्णास प्रार्थिलें त्या वेळीं ' भूयः कथय तृप्तिर्हि शृण्वतो नाऽस्ति मेऽमृतं'– म्हणजे, ' तुझ्या अनंत विभूति व त्यांचें माहात्म्यरूपी अमृत श्रवणेंद्रियद्वारां प्राशन करीत असतां माझी तृप्तीच होत नाहीं, तरी तें पुनः एकदां सांग. ' असें भगवंतांस म्हटलें आहे. अर्जुनाच्या रूपानें प्रत्येक आर्यहृदयाचीच ही मनोवृत्ति व्यक्त झाली आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं.

रा. साने यांनीं भगवान् कृष्णचरित्र साध्या व सुसंगत कथानकाच्या रूपानें लिहिलें असून, भाषाशैली चटकदार व आकर्षक आहे. तसेंच, श्रीकृष्णचरित्रांतील निरनिराळ्या प्रसंगांचें रम्यत्व व व्यावहारिक बोधपर रहस्य वाचकांच्या मनांवर ठसविण्यासाठीं त्यांनीं योजलेली तात्त्विक विचारात्मक व काव्यमय भाषाशैली आणि केलेलीं उठावदार वर्णनें (उ० श्रीकृष्णजन्म, गोकुळवर्णन, रासक्रीडावर्णन, इ. ) फार परिणामकारक झालीं असून या प्रतिपादनाच्या ओघांतच त्यांनीं जीं प्रसंगोपात्त श्रीधर, एकनाथ, मोरोपंत, वामन, नामदेव इ० जुन्या साधुसंत व प्रासादिक सत्कवींचीं आणि कै. अण्णासाहेब किर्लोस्कर, रे. टिळक, व ' गोविंदाग्रज ' इ. अलीकडील सहजमधुरकाव्यरचनासंपन्न सत्कवींचीं शोभापोषक वचनसुमनें विखरून दिलीं आहेत, त्यायोगानें तर सहृदय वाचकांला विशेष

आल्हाद वाटल्यावांचून रहाणार नाहीं असें मला वाटतें. या दोन विशेषां-मुळें, रा. साने यांचें पुस्तक, रा. ब. चिं. वि. वैद्य यांचें जें, श्रीकृष्णाचें 'चरित्र' या दृष्टीनें लिहिलेलें अत्यंत वाचनीय व नमुनेदार पुस्तक आहे, त्याहून निराळ्या स्वरूपाचें झालें आहे; म्हणून याचीही कांहीं विशिष्ट वाचकवर्गास उपयुक्तता वाटेल. प्रस्तुत पुस्तकांत कित्येक ठिकाणीं, 'झकास बेत' 'नारद......चालते झाले' अशासारखे, विषयाच्या गांभीर्याची हानि करणारे शब्दप्रयोग झाले आहेत, परंतु अशीं स्थळें फार थोडीं आहेत.

सारांश, विषयविवेचनाच्या आणि भाषाशैलीच्या दृष्टीनें पाहिलें असतां, रा. साने यांचें पुस्तक चटकदार व बोधप्रद झालें आहे; त्यामुळें तें मुलां-मुलींच्या हातीं देण्यास योग्य व उपयुक्त असून प्रौढ वाचकांसही तें वाच-नीय वाटल्यावांचून रहाणार नाहीं असें माझें मत आहे.

प्रस्तुत पुस्तकाबद्दल रा. साने यांचें मी अभिनंदन करितों व यापुढें त्यांच्या हातून अशीच वाङ्मयसेवा दीर्घकालपर्यंत होत राहो, असें मी मनःपूर्वक इच्छितों.

पुणें. माघ शु॥ द्वितीया शके १८४४,
( ता. १९।१।२३. )

श्री. नी. चापेकर.

---

रा. साने यांचें " भगवान् श्रीकृष्ण " हें नवें पुस्तक मीं वाचून पाहिलें यांत अर्थात् एकच विषय श्रीकृष्णचरित्राचा घेतला आहे. पण तोच चित्ताकर्षक कसा होईल याचाच अनेक अंगांनीं प्रयत्न करून तो वर्णिलेला आहे. वर्णनांत कोठें कादंबरी, कोठें नाट्यखंड, कोठे इतिहास, कोठें तत्त्वविवेचन, अशा लेखनपद्धतीचा भास विषयपरत्वें होत असून एकंदर विवेचनपद्धति उद्बोधक अशी साधली आहे. ठिकठिकाणीं विषयपरत्वें इतर ग्रंथांतील अवतरणें सहज उपयोगांत आणल्यानें बहुश्रुत-पणाचाही भास होतो. रा. साने हे असेच निरानिराळे तुटक विषय घेऊन

त्यांवर लहान लहान पुस्तकें लिहितील तर बरें होईल. मात्र प्रस्तुत ग्रंथरचनापद्धतींत लहान विद्यार्थ्यांना सुगम नाहीं व प्रौढ मनुष्यांना हवी तशी चिकित्सकपद्धति नाहीं असा एक दुहेरी दोष इतर गुणांबरोबरच यांत येत आहे, येवढें मात्र सांगणें जरूर वाटतें. तथापि, ग्रंथकर्त्याच्या हेतूप्रमाणें तें तरुण विद्यार्थ्यांना उपयुक्त होईल व आवडेल यांत शंका नाहीं.

ता. १९।१।२३. न. चिं. केळकर.

---

रा. रा. गंगाधर रामचंद्र साने, बी. ए. यांनीं ' भगवान् श्रीकृष्ण ' या नांवाचें एक लहानसें पुस्तक लिहून नुकतेंच प्रसिद्ध केलें आहे. पुस्तकाच्या नांवावरूनच त्यांतील विषय समजण्यासारखा आहे. हें पुस्तक आम्हीं साद्यंत वाचून पाहिलें. रा. साने यांनीं कांहीं महिन्यांपूर्वीं 'कमला' या नांवाची एक लहानशी सामाजिक कादंबरी लिहून प्रसिद्ध केली. तिच्या प्रस्तावनेंत आम्हीं रा. साने यांच्याविषयीं आशा प्रदर्शित केली होती कीं, त्यांच्या हातून उत्तरोत्तर अधिक सरस व निर्दोष ग्रंथरचना होईल. प्रस्तुतच्या कृष्णचरित्रानें ती आशा विफल केली नाहीं ही संतोषाची गोष्ट आहे. प्रस्तुत लेखांत कृष्णजन्मापासून तों भारतीय युद्धापर्यंतचें श्रीकृष्णाचें चरित्र वर्णिलेलें आहे. व्यासकृत श्रीमद्भागवत, महाभारत व हरिवंश हे संस्कृत ग्रंथ, व नामदेव, श्रीधर, वामनपंडित, तुकाराम, मोरोपंत, मध्वमुनीश्वर, अमृतराय इत्यादि मराठी ग्रंथकारांच्या कृष्णचारित्रपर कृति, यांच्या आधारानें प्रस्तुत पुस्तक लिहिलें आहे. कंसाचें क्रौर्य, कृष्णजन्मप्रसंग, वृंदावनविहार, कालियामर्दन, कंसवध, अक्रूरसंदेश, कालयवनहनन, रुक्मिण्यादिविवाह, सुदामचरित्र इत्यादि प्रसंगांचीं या पुस्तकांतलीं वर्णनें हृदयंगम आहेत. त्यांत कथानुरोधानें भयानक, वत्सल, शांत, अद्भुत, वीर, करुण इत्यादि रसांचा उठाव झालेला आहे. श्रीकृष्णाचे आदर्शभूत गुण म्हणजे त्याचें अलौकिक ज्ञान व वक्तृत्व, त्याची राजनीतिकुशलता, त्याची सर्वथा निस्वार्थबुद्धि, त्याचा अतुल पराक्रम, सज्जनपरित्राण व खलसंहार या-

विषयींचें त्याचें ब्रीद व त्याचें उदार, उदात्त व शुद्ध चारित्र्य यांस त्याच्या उत्तर चरित्रांतच विशेष अवसर मिळाला आहे. पुत्र, मित्र, बंधु व पति या नात्यानें कृष्णानें केलेल्या लीलांनींच प्रस्तुतच्या त्याच्या पूर्व-चरित्रास अपूर्व माधुर्य आलें आहे. यांतील सर्व प्रसंग व वर्णनें लेखकानें निरतिशय भक्तिप्रवण अंतःकरणानें लिहिलीं आहेत. या दृष्टीनें या लेखाला 'कृष्णलीलामृत' ह नांव अन्वर्थक झालें असतें. लेखकाची भाषाशैली एकंदरींत मोहक आहे. लेखकाच्या भक्तिप्रेमरंगांशीं त्याच्या बहुश्रुततेचा संगम झाल्यामुळें चरित्रास विचित्रता आली आहे. अवतरणें व प्रतीकें यांनीं मात्र या लेखांत गर्दी करून आपलें वर्चस्व स्थापण्याचा शिकस्तीचा प्रयत्न केला आहे; तसेंच एकेक शब्दाला दोन दोन तीन तीन पर्याय-शब्द देण्याची लेखकाची अनावर प्रवृत्ति रसिक वाचकांस उद्वेग उत्पन्न करील असें वाटतें. तथापि हे दोष लेखकाला सहज टाळतां येण्यासारखे आहेत. शुक-परीक्षितांसारख्यांमध्यें देखील रासक्रीडेसंबंधानें शंकासमाधानाचे प्रसंग आलेले आहेत; मग आजच्या कित्येक चिकित्सक रसिकांच्या अंतःकरणांत ती रासक्रीडा व्रीडा किंवा पीडा उत्पन्न करीत असल्यास त्यासंबंधानें खेद किंवा आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं. श्रीकृष्णाचें ह गद्यात्मक अल्प पूर्वचरित्र भक्तिमान् वाचकांस प्रिय होईल असें वाटतें. यापेक्षां मोठ्या साद्यंत कृष्णचरित्राची भूक वाचकांस असल्यास रा. ब. चिंतामणराव वैद्य यांचें विस्तृत, व्यापक व सर्वांगपरामर्षी श्रीकृष्णचरित्र त्यांनीं वाचावें.

ता. २२-१-२३. **प्रो० लक्ष्मणशास्त्री लेले.**

---

भगवान् श्रीकृष्ण, अथवा श्रीकृष्णाचें नितान्तरम्यचरित्र, या पुस्तकांतील बराचसा भाग मीं वाचून पाहिला. त्यावरून पाहतां हें पुस्तक फार चांगलें झालें आहे, असें म्हणण्यस हरकत नाहीं. श्रीकृष्णाचें चरित्र आधीं मूळचेंच रम्य आहे. पण त्यांतही रा. साने यांनीं आपल्या प्रेमळ वाणीनें

तें जास्तच रम्य केलें आहे. भगवान् श्रीकृष्णाच्या चरित्रांतील गोष्टी ज्या एकदां घडून आलेल्या आहेत, त्या कायमच आहेत. परंतु त्याच गोष्टी प्रस्तुत परिस्थितीला अनुलक्षून मनोवेधकपणानें आणि बोधप्रदपणानें लिहिण्यामध्यें रा. साने यांनीं जें कौशल्य दाखविलें आहे, तें वर्णनीय आहे. पुस्तकाची भाषा प्रौढ आणि प्रेमळ आहे. आणि वर्णनाची शैली मोहक व भक्तिरसपूर्ण आहे. श्रीकृष्णाचें चरित्र बहुतेक प्रत्येक मराठी कवीनें वर्णिलें आहे. आणि त्या प्रत्येक कवीच्या काव्यांतील कितीतरी पद्यें आपल्या समाजामध्यें त्यांच्या प्रेमळपणामुळें सर्व लोकांच्या तोंडीं झालेलीं आहेत. असल्या बहुतेक सुंदर व लोकप्रिय पद्यांचा समावेश रा. साने यांनीं आपल्या प्रस्तुतच्या पुस्तकामध्यें ठिकठिकाणीं केलेला आहे. ज्ञानेश्वर, नामदेव, मुक्तेश्वर, तुकाराम, वामनपंडित, मोरोपंत, मध्वमुनीश्वर, अनंतफंदी, वगैरे अनेक उत्कृष्ट कवींचे कृष्णचरित्रपर, भक्तिपर किंवा वेदांतपर असे कितीतरी उत्कृष्ट वेंचे रा. साने यांनीं आपल्या पुस्तकांत निरनिराळे प्रसंग साधून ग्रथित केले आहेत. व त्यामुळें एकंदर पुस्तकामध्यें भक्तिरस आणि प्रेमळपणा यांचा परिपोष फार परिणामकारक झाला आहे. क्वचित् प्रसंगीं तर हे वेंचे इतके झालेले आहेत कीं, सरसतेच्या दृष्टीनें त्यांची संख्या जरूरीपेक्षां कधीं कधीं ज्यास्त झाल्यामुळें हें पुस्तक गद्यमय असूनही जणुंकाय पद्यमयच आहे, असा अतिरेकाचा भास उत्पन्न होतो. तरीपण या प्रेमळ कवींच्या प्रेमळ वचनांची प्रेमळ भर प्रस्तुतच्या चरित्रामध्यें पडल्यामुळें एकंदरीमध्यें भक्तीचा, करुणरसाचा आणि वात्सल्याचा उत्कर्ष उत्तम साधला आहे, यांत शंका नाहीं.

स्वराज्य ऑफिस,<br>
२१।१।२३.

शि. म. परांजपे.

# हृदयनिवेदन !

अहाहा ! वाचक, आजचा आनंदाचा आणि भाग्याचा दिवस त्या प्रेमळ प्रभूनीं आम्हांस दाखविला याबद्दल आम्ही त्या मंगलमयाचे सदैव ऋणी आहोंत. आणि ही आमची कृतज्ञता त्याच्याच कृपेनें तयार झालेलें प्रस्तुत पुस्तक त्याचेच चरणीं अर्पण करून—ही वाग्वैजयंती त्याचेच गळां घालून—आम्ही व्यक्त करीत आहों, ती तो गोड करून घेवो, एवढीच आमची त्या दीनदयाळ भक्तवत्सल परमेश्वराजवळ प्रार्थना आहे !

वास्तविक " माझा मराठाचि बोल निके । परी अमृतातेंहि पैजां जिंके " अशा तोडीचे बोल बोलण्याची कां माझी योग्यता ? पण त्याची कृपा असल्यावर रंकावरतीहि चवऱ्या उडूं लागतात, आणि मुकेही बृहस्पती-सारखे बोलूं लागतात. यासाठीं आमचा जणों हात धरून ज्या प्रेमळ गोपाळानें प्रस्तुत चरित्र आमच्याकडून लिहविलें त्याच्याविषयीं वाटणारें कृतज्ञतेचें प्रेम आणि उमाळा कोणच्या शब्दांत व्यक्त करावा हेंच आम्हांस समजत नाहीं. तेव्हां वारंवार हें मस्तक त्याचे चरणावर ठेवून सगद्गद कंठानें " भगवन्, अशीच ह्या रंकाची सदैव आठवण ठेवा " अशी त्या दया-घनाजवळ प्रार्थना करून भक्तिप्रेमाचे अश्रू टप् टप् गाळणें यावांचून आम्ही दुसरें काय करणार ?

प्रस्तुत चरित्राचें लेखन सुरू असतां आमचे प्रेमळ रसिक वडील बंधु ती. त्रिंबकराव यांनीं वारंवार तें वाचून पाहून आम्हांस जो अपूर्व उत्साह दिला व आमचे मित्र रा. भिंगे यांनीं आम्हांस ज्या बिनमोल उपयुक्त सूचना दिल्या त्यांबद्दल आम्ही दोघांचेही अत्यंत ऋणी आहोत. तसेंच प्रस्तुत पुस्तकास कथानकाच्या दृष्टीनें मुख्यत्वेंकरून ज्यांच्या " श्रीकृष्णचरित्रा " चा आम्हांस बिनमोल उपयोग झाला त्या रा. ब. चिंतामणराव वैद्यांचेही आम्ही

फार आभारी आहों. त्या प्रेमळ महाभागानें प्रस्तुत ग्रंथावर सुंदर व गोड अभिप्राय लिहून देऊन आम्हांस अधिकच ऋणी करून ठेविलें आहे! त्यांच्याचप्रमाणें विविध व्यवसाय मागें असूनही श्रीयुत परांजपे, प्रो. चापेकर, प्रो. लेलेशास्त्री, श्री. न. चिं. केळकर यांनींहि आम्हांस आपापले अभिप्राय लिहून दिले व प्रस्तुत ग्रंथास अधिकच शोभा आणली याबद्दल त्यांचेहि आम्ही अत्यंत आभारी आहोंत. सरतेशेवटीं वर्षाची अखेर आली असूनही त्या कामाच्या गर्दींतच आर्यभूषण छापखान्यानें प्रस्तुत ग्रंथाचें काम शक्य तितकें सुबक व सुंदर करून दिलें याबद्दल त्या छापखान्याचे मालक यांचेही आभार मानणें उचित होणार आहे.

अखेर, प्रस्तुत ग्रंथांत शक्य तितकी काळजी घेऊनहि कांहीं मुद्रणदोष राहून गेले असतील ( उदाहरणार्थ पान ४४ वर सातव्या ओळींत ' हृदया असतां ' असें आहे तेथें ' हृदयीं असतां ' असें पाहिजे ) तर त्यांबद्दल " एथ न्यून तें पुरतें । आधिक तें सरतें । करुनि घ्या हें तुमतें । विनवीतसें ॥ " यापेक्षां आम्हीं अधिक काय म्हणणार ? आणि आमचे प्रियवाचकही आम्हांस त्याबद्दल थोर मनानें क्षमा करतील अशी आम्हांस आशा आहे.

सरते शेवटीं ' माले ' संबंधीं विनंतिपर चार शब्द लिहिल्यास अप्रस्तुत होणार नाहीं. महाराष्ट्र वाङ्मयोद्यानांत नवीनच पण जोमानें अंकुरित होऊं पहाणाऱ्या प्रस्तुत मालेस सांवरण्यास सहृदय वाचक स्नेहानें आपला सहायक हात देतील व तिला अधिकाधिक वर्गणीदार मिळवून देऊन सतत प्रफुल्लित ठेवतील अशी आशा आहे. प्रस्तुत महागाईच्या काळांत पुस्तकप्रकाशनाचें कार्य किती अवघड असतें हें सहृदय वाचक जाणत असतीलच. तरी आमच्या कायम आश्रयदात्यांनीं आम्हांस अजून दोन दोन तरी वर्गणीदार मिळवून देऊन " वाङ्मयोदधीच्या कड्याकपाऱ्यांतून दारिद्र्य व उपेक्षा यामुळें पडून राहिलेलीं अज्ञात पण पाणीदार अशीं " मोलाचीं माणिक मोतीं " यथाशक्ति बाहेर काढून त्यांस चमक-

ण्यांस सुसंधी प्राप्त करून द्यावी व ऐतिहासिक, ललित, पौराणिक, निबंधात्मक, चरित्रात्मक, काव्यमय अशा सर्व प्रकारचें उत्तम वाङ्मय प्रकाशित करून जनतेची व महाराष्ट्रसाहित्याची सेवा करावी " असा जो प्रस्तुत मालेचा उद्देश तो पूर्ण करण्याचे कामीं आम्हांस साहाय्य करावें, अशी आमची त्यांजवळ प्रेमाची प्रार्थना आहे. ती ते पुरी करतील अशी आशा आहे.

अखेर, प्रस्तुत पुस्तकानें सर्व आबालवृद्ध स्त्रीपुरुषांस— विशेषेंकरून सुशिक्षित कॉलेजिएट तरुणांस त्या श्रीकृष्णाचा—त्याच्या मधुर मुरलीचा प्रेमळ प्रीतीचा, दिव्य सौंदर्याचा, व चिन्मय स्वातंत्र्याचा छंद लागो व त्या स्वातंत्र्याच्या, प्रेमाच्या, संगीताच्या दिव्य समाधींत डोलतां डोलतां ' भक्त ऐसे जाणा जे देहीं उदार ' असे तरुण भक्तवीर निर्माण होवोत अशी त्या प्रेममयाची प्रार्थना करून पुरें करतों.

सर्वांचा नम्र—

ता. २२।१।२३.

गंगाधर.

# पुस्तकांतील भागांची सूची.



भागः—





# भगवान् श्रीकृष्ण !

## अथवा

## ( श्रीकृष्णाचें नितांत रम्य चरित्र ! )

## भाग पहिला.

महाभारताच्या अथांग सागरांतून वाचकांस आतां मथुरा, गोकुळ, वृंदावन, द्वारका इत्यादि रम्य प्रदेशांत नेण्याचा आमचा विचार आहे.* यमुना नदीच्या सुरम्य तटाकीं असणाऱ्या कुंजवनांत व मधुवनांत मधुकराप्रमाणें गुंजारव करीत वाचकांनीं आमच्या पाठोपाठ यावें अशी आमची त्यांस नम्र विज्ञप्ति आहे. महाभारताच्या अथांग सागरांतून ज्या केशवकैवर्तकाच्या साहाय्यानें पांडव ती रणनदी उतरून पार झाले त्या कैवर्तकाचें चरित्र यापुढें गाण्याचें आम्हीं योजिलें आहे. त्या कामीं तो गोपालकृष्ण आम्हांस सहाय्य करो अशी अत्यंत लीनपणें त्याच्या चरणीं आमची प्रार्थना आहे.

चला तर वाचक मथुरेस ! पण हाय ! वरील रम्य प्रदेश पहावयास जाण्यापूर्वी आपणास मथुरेंतील एक भीषण देखावा पहाणें भाग आहे ! तो पारतंत्र्यांतला देखावा होता. पारतंत्र्यांतला कोणचा देखावा सुंदर असूं शकेल ? मथुरा सुंदर नव्हती काय ? मधु राक्षसानें वसविलेली मथुरा सुंदर नव्हती काय ? शत्रुघ्नाच्या शूरसेनेनें मधुराक्षसास ठार मारून सुरम्य बनविलेल्या शूरसेन प्रदेशांतील मथुरा कमनीय नव्हती काय ? त्या उंच उंच माड्या व भव्य प्रासाद, जागोजाग असणारे ते बागबगीचे, यमुनेचें तें अर्धवर्तुलाकार पात्र, अमित रत्नांचे ते बाजार, व तें सुंदर

*प्रस्तुत चरित्र महाभारतानंतर लिहिलें आहे. महाभारतही--" भारतीय संग्राम " ह्या नांवाखालीं—लवकरच वाचकांस सादर करण्याचा आमचा विचार आहे.

—ग्रंथकर्ता.

हवापाणी ह्यांहींकरून मथुरा सुदर नव्हती काय ? वरवरच्या, ऐहिक, पार्थिव दृष्टीनें पाहिल्यास मथुरा सुंदर असेल. पण सर्व सौंदर्याचा नाश करणारें पारतंत्र्याचें वातावरण त्या सर्वांवर भरून राहिलें होतें. राजा रामचंद्राच्या वेळचा सूर्यवंशीय काळ जाऊन कलियुगप्रारंभाच्या चंद्रवंशीय कालास सुरवात होऊन लोभाचें व दुष्टाव्याचें रान तीन ठिकाणीं मुख्यत्वेंकरून माजलें होतें. पैकीं दुर्योधनाच्या ' लोभमूलानि पापानि ' चा भयंकर परिणाम आपण महाभारतांत वाचलाच आहे. तत्पूर्वीचा कंसाचा दुष्टपणा आपणांस आतां पहावयाचा आहे. आपल्या वृद्ध पित्यास —उग्रसेनास—बंदींत घालून त्याचें राज्य बळकावणारा दुरात्मा कंस मॅक्बेथप्रमाणें किंवा अवरंगजेबाप्रमाणे संशयी बनला व पहिला अन्याय पचविण्यासाठीं दुसरा व दुसऱ्यासाठीं तिसरा अशी पापांची रास त्यानें रचण्यास प्रारंभ केला. त्या पाहिल्यात का तुरुंगाच्या भयाण भिंती ! त्या तुरुंगाच्या तटांच्या भीषण आवारांत तें पहा एक हतभागी दंपत्य आपल्या आयुष्याचे दिवस मोठ्या कष्टानें कंठीत आहे ! हरहर ! "फारचि बरी निरयगति परवशता शत गुणें करी जाच" हे सैरंध्रीला मद्यपात्र घेऊन कीचकाकडे जाण्याचा प्रसंग आला त्यावेळीं पंतांनीं काढलेले उद्गार अक्षरशः खरे आहेत. गरीब बिचाऱ्या त्या जोडप्यास तुरुंगाचे हाल अपेष्टा भोगावयास लावण्यासारखा त्यांचा अपराध तरी काय होता ? तर त्यांच्या पोटीं येणाऱ्या आठव्या मुलाचे हातून त्या मथुरेच्या दुष्ट व पापी राजाचा नाश होणार होता असें त्यास कळलें होतें आणि म्हणूनच त्या दुष्ट राजानें—कंसानें—वसुदेव-देवकीस—आमच्या अभागी जोडप्यास त्या तुरुंगांत बंदिवान् करून ठेवलें होतें. व त्याच्या मनांत भीषण विचारांचें वादळ सुरू होतें. वास्तविक उग्रसेनाच्या धाकट्या भावाची—देवकाची मुलगी देवकी हिचा पति असणारा वसुदेव कंसाचा मेहुणा होता व देवकी कंसाची चुलत बहीण होती. पण विधिघटनेच्या दैवदुर्विलासानें हाल भोगणें आज त्यांच्या नशिबीं आलें होतें.

स्वातंत्र्याच्या वातावरणांतील रम्य देखावे दाखविण्याचें प्रथम आश्वासन देऊन आम्ही प्रथम वरील पारतंत्र्याचा भयाण देखावा वर्णीत आहों हें पाहून वाचक आमच्यावर कदाचित् थोडेसे रुष्ट झाले असतील. पण प्रिय वाचक ! पारतंत्र्यांतलें भयाण चित्र पाहिल्याशिवाय आजवर कोणास स्वातंत्र्याचें रम्य दर्शन झालें आहे ? यासाठीं त्या भावी स्वातंत्र्याचा आनंद लुटण्यापूर्वी त्याच्या पूर्व तयारीचीं पारतंत्र्यांतलीं हृदयभेदक दृश्यें आपणांस पाहिलींच पाहिजेत.

वरील प्रमाणें वसुदेव-देवकीस बंदींत घालून खुळा बिचारा कंस त्यांतल्या त्यांत समाधान मानून राहिला. त्या अभागी जोडप्यास बंदिवासांत घातलें तेव्हां त्यास कुठें थोडेंसें हायसें वाटलें. पण त्या खुळ्याला असें कळेना कीं, यानें का आपला मृत्यु टळणार आहे ? परीक्षिति राजा समुद्रांत जलमंदिर बांधून त्याच्या वरच्या मजल्यावर राहिला तरी बोरांतल्या आळीचा सर्प बनून तो शापाप्रमाणें सर्पदंशानेंच मेला ! होणारें प्रारब्ध - विधीची रेषा टाळणें महाकठिण आहे व दुष्ट व पापी दुरात्म्यास तर तें अशक्यच आहे. परंतु याची त्या वेड्या कंसाला कोठून दाद असणार ? स्वतःचा जीव बचावण्यासाठीं तो उपायाच्या रूपानें एक एक पापाची व दुष्टपणाची मात्र आधींच्या पातकांत-ज्यासाठींच त्याचा नाश होणार होता त्यांत-भर घालूं लागला. अशा रीतीनें 'बुडत्याचा पाय खोलांत' या न्यायानें तो जे उपाय म्हणून करूं लागला तेच मूर्तिमंत अपाय बनून त्याचा मृत्यु अधिकच जवळ आणण्यास कारण झाले. ' विनाश काले विपरीतबुद्धि ' व्हायचीच. आणि हालवून खुंटा बळकट करून घेण्यासाठीं मथुरेच्या बाहेरच्या बगीचांत तळ देऊन त्यास बोलावून घेणाऱ्या नारदांनीं जेव्हां त्यास " काय आठवा पुत्र तुझा वैरीना ? " म्हणून विचारलें तेव्हां कंस गदगदां हंसला व " सगळींच कारटीं मारून टाकतों म्हणजे आठवा अन् नववा ही भानगडच नको. देव मला कदाचित् फसवीत असतील. पण मी असें तसें काम करणारा नाहीं आहें म्हणावं. मी पक्का शेराला सव्वाशेर आहें. " एकजात सगळीं कार्टीं मारून टाकतों. काय नारदा ? आहे कीं नाहीं झकास बेत ? हा ! हा ! हा ! " कंसानें अट्टाहास करीत नारदास प्रत्युत्तर दिलें. त्याचा तो भीषण विचार ऐकून नारदासारख्याच्याहि अंगावर क्षणमात्र शहारे आले ! पण कंसासारखा पापाच्या खोल दरींत बुडालेला-शेवटच्या पायरीवरूनहि घसरलेला व जन्मभर डायरशाही गाजवणारा नराधम जितका लवकर मृत्युवश होईल तितकें चांगलेंच. कारण पृथ्वीचा भार तितकाच हलका होईल, असा विचार करून नारदानींही वरकरणीं हंसून " वाः कंसा ! तूं देवाहूनहि वस्ताद आहेस रे ! " अशी त्याची पाठ थोपटून ते आकाशमार्गें ईश्वरभजन करीत चालते झाले.

देवकीच्या पोटीं येणाऱ्या प्रत्येक कारट्याला जन्मतःच शिळेवर आपटून ठार मारण्याचें कंसानें ठरविलें, व त्या अभागी दंपत्याच्या तुरुंगावर कडेकोट पहारा ठेवला व देवकीस मूल झालें हें कळल्याबरोबर तो दुरात्मा तत्काळ तुरुंगाकडे निघाला. अरेरे! पोटच्या गोळ्याचा-तान्ह्या बालकाचा-नवजात अर्भकाचा असा निर्दय खून

पाहण्याचा त्या नवराबायकोवर—वसुदेवदेवकीवर—प्रसंग योवोना ! तुरुंगांत आल्या· बरोबर कंसास काय दिसलें ? संध्याकाळचा समय झालेला होता. देवकी तान्ह्या लेंकरास पाजीत होती ! पण त्या दुष्ट निर्दयास त्याची यत्किंचित्हि कीव न येतां त्यानें खसदिशीं तंगडी धरून तें लेंकरूं देवकीपासून ओढलें व एखाद्या मांगासारखा तो त्या गोजिरवाण्या बालकास ठार मारण्यास प्रवृत्त झाला ! अरेरे ! यावेळीं एखाद्या फत्तराचा हातही लुला पडता ! देवकीचा तो करुणपूर्ण विलाप ऐकून एखाद्या पाषणासही पाझर फुटला असता ! पण वसुदेव—देवकीच्या पहिल्या प्रीतीचें तें फूल कुसकरून—चुरगळून—चोळामोळा करून फेकून देण्यास तयार झालेला कंस फत्तराहून फत्तर व मांगासहि लाजविणारा मांग होता ! त्याला कुठली दया यायला ? त्या अभागी दंपत्याच्या हृदयभेदक शोकानें सर्व चराचर सृष्टि विलाप करूं लागली. पण त्याचें त्या निर्दयाला काय होय ? त्यानें आपल्या पातकांची हंडी पुरेपूर भरण्यासाठींच कीं काय त्या तसल्या करकरीत तिनीसांजा झालेल्या असतांना त्या गरीब हंसाच्या बालकाचा शिळेवर हापटून जीव घेतला ! वसुदेव—देवकीचा " पहिल्या प्रीतीचा साक्षीदार देवाकडे " कंसाच्या निर्दयपणाची " साक्ष द्यावयास गेला." " संसाराच्या सारीपटांतला प्रेमाचा पहिला डाव देवगजाननाला दिला ! " वाचकांच्या हृदयास ह्या निर्दय प्रसंगानें धक्का बसला असेल. पण वस्तुस्थितीपुढें आम्ही तरी काय करणार ? वाचकांना यापुढें सहृदयत्वाच्या दृष्टीनें विशेष त्रास होणार नाहीं असें आम्ही आश्वासन देतों. यासाठीं त्यांनीं आपल्या शोकाकुल हृदयास कसेंबसें सांवरून आमच्या पाठोपाठ यावें. पण स्वातंत्र्याचा मार्ग सुखाचा नसतो. रक्तमांसांचा चिखल तुडविल्याशिवाय स्वातंत्र्य मिळत नसतें हें रामायण व महाभारत ह्या दोन्ही कथा सांगतात. रक्तमांसचिखलाच्या पायावरच स्वातंत्र्याची इमारत उठत असते. पारतंत्र्यांतल्या हजारों हत्यांच्या पोटींच स्वातंत्र्य जन्मास येत असतें हें त्यांनीं लक्षांत ठेवावें. इथेंही तोच प्रकार झाला. देवकीच्या तुरुंगावर खडा पहारा रात्रंदिवस सारखा जागता ठेवून देवकी प्रसूत झाली रे झाली कीं हा दुष्ट तिथें जाई व त्या गरीब अनागस लेकरास ठार मारीत असे. पोटच्या अर्भकांचे असे निर्दय खून पहाण्याचें त्या दंपत्याच्या नशिबीं यावें याहून खडतर दैवविलसित तें कोणचें असणार ?

याप्रमाणें होतां होतां सहा पुत्र मारून झाले. कंसाचा मृत्यु जन्मास येण्याची वेळ जवळ येऊन ठेपली. एक एक दिवस लोटे तो कंसाच्या हृदयाचा थरकांप

जास्त वाढवून जात असे, करतां करतां देवकी सातव्यांदां गर्भार झाली. पण सहा पुत्रांच्या मृत्यूनें भ्यायलेल्या त्या दीन गायीचा गर्भ या खेपेस पोटांतच गळाला. वसुदेवाची दुसरी भार्या रोहिणीही वसुदेवाबरोबर त्या भयाण तुरुंगवाड्यांतच होती. तिलाही याच सुमारास गर्भ राहिला, तेव्हां संशयाच्या तारेंत पापी कंस तिच्याहि पुत्रास ठार करायचा या भयानें गोवर्धनाजवळच्या आपल्या जहागिरीजवळ राहणारा गौळवाड्याचा पाटील नंद त्याचा मित्र होता त्याच्याकडे तिला वसुदेवानें पोंचती केली. शेवटीं देवकी आठव्यांदां गर्भार राहिली. ती वार्ता कळल्यापासून कंसाचा जीव सारखा खालवर होत होता. तथापि तो जातीचा दुष्ट असल्यामुळें आपली ही स्थिति कोणास दिसून येऊं नये म्हणून खोट्या हास्याचें व उत्साहाचें आवरण आपल्या मुखावर बळेंच खेळविण्याची त्यानें पूर्ण खबरदारी घेतली होती; पण ' अंदर की बात राम जाने !' बाहेरून मात्र खोटेंच अवसान आणून एकीकडे छाती धडधडत होती तरी--त्यानें तेव्हांपासूनच देवकीच्या कोठडीवर डोळ्यांत तेल घालून नंग्या समशेरीचा खडा पहारा ठेवला ! परंतु स्वातंत्र्याची सर्वगामी सत्ता अशा खड्या पहाऱ्याच्या तुरुंगांतच जन्मास येऊन त्यांतून बिनहरकत बाहेर पडते--तिच्यापुढें तुरुंगाचीं कड्याकुलपें व शिपायांच्या तरवारी लटक्या पडतात--याची, व देवकीच्या पोटीं येणारें हें आठवें बालक म्हणजे मूर्तिमंत चैतन्य--स्वातंत्र्य होतें याची बिचाऱ्या कंसास काय कल्पना? ' बायरन् ' नामक विख्यात आंग्लकवीनें म्हटल्याप्रमाणें " दगडांच्या चार भिंतींच्या आवारांनीं खरा तुरुंग होत नसतो "-.स्वातंत्र्यप्रिय आत्मा अशा चौफेर संगिनींच्या कोटांतूनही बाहेर पडत असतो याची त्या खुळ्याला कोठून कल्पना असणार ? स्वातंत्र्याचा जन्म तुरुंगांतच होत असतो ! व मथुरेच्या तुरुंगांत देवकीच्या कोठडींत देवकीच्या पोटीं तेंच स्वातंत्र्य जन्मास आलें ! तो अष्टमीचा दिवस होता. रात्रीं बारा वाजण्याचा सुमार झाला होता. बाहेर मुसळधार पाऊस पडत होता ! तुरुंगाजवळून वाहणारी यमुना नदी आनंदानें नाचत होती ! आकाशोद्यानांत गर्दी करणारे मेघ आपला आनंद जलवृष्टि करून प्रदर्शित करीत होते ! स्वातंत्र्यजन्माचे प्रसंगीं याप्रमाणें बाहेर जलधारांचें तांडव आणि विद्युल्लतेचें नृत्य सुरू असतां श्रावण वद्य अष्टमीस देवकीचें आठवें बालक आठव्याच महिन्यांत जन्मास आलें--त्या चिन्मय स्वातंत्र्यमूर्तीस नऊ मास पुरे भरण्याइतका सुद्धां जणों दम निघाला नाहीं ! अथवा बाह्यतः जन्माचे कामीं व भावी आपत्ति टाळण्याचे कामीं सुद्धां वसुदेव-देवकीस

चिंतामुक्त करण्यासाठीं बाह्य परिस्थितीची सांगडही त्या प्रभूनें चांगलीच जुळवून आणली. कंसाच्या भयानें धस् धस् करणारें देवकीचें पोट अकालींच आंतील गोळ्यास बाहेर टाकून रिकामें झालें. पण तें सर्व ऐहिक दृष्ट्या त्यांच्या पथ्यावरच पडलें. असो. ' विजय ' मुहूर्तावर जन्मलेल्या या बालकानें सर्वत्र स्वातंत्र्याचा—प्रेमाचा—भक्तीचा विजयच केला हें साहजिकच आहे. स्वातंत्र्याचा जन्म ' विजय ' मुहूर्तावरच व्हायचा ! प्रसूतीची वेळ जसजशी जवळ येत चालली तसतशी देवकीची तंद्री लागूं लागली. अशा रीतीनें स्वस्वरूपाचे—त्या चिदानंदाचे ठायीं देवकीची वृत्ति तदाकार होऊन रंगून गेली आहे तोंच त्या पारतंत्र्याच्या अंधार कोठडींत कोटिरवींच्या तेजाची प्रभा ज्याच्या मुखमंडलावर फांकली आहे अशी वैकुंठनायकाची आठ वर्षांची अयोनिसंभवा मूर्ति देवकीपुढें उभी राहिली !—देवकीचीं गर्भचिन्हें मावळलीं—स्वातंत्र्याचा जन्म झाला ! सर्व विश्वांत भरलेलें चैतन्य आज साकार झालें ! कंस—चाणूरांसारख्या दुष्टांनीं पृथ्वीला त्राही त्राही केलें असतां गोमातेच्या रूपानें वैकुंठास जाऊन पृथ्वीनें केलेल्या प्रार्थनेचें फळ मिळालें. धर्माची ग्लानि होऊन अधर्माचें बंड जगावर माजलें होतें, गोब्राह्मणांचे हाल होत होते, प्रजा कंसाच्या त्रासानें गांजून गेली होती, पतिव्रतांच्या अब्रूंचे धिंडवडे उडत होते, व साधूंचा छळ होत होता यासाठीं तो ' ब्रह्मण्य देव, ' तो " पतिव्रतांचा पाठिराखा परमेश्वर, " गोब्राह्मणहितकर्ता तो जगदीश, साधूंचें परित्राण व दुष्टांचें निर्दलन करणारा तो परमात्मा आज भूलोकावर अवतरला होता. पापाच्या—अज्ञानाच्या निबिड, काळ्याकुट्ट अंधकाराचे मेघ व पर्वत पसरले होते पण या " अज्ञानाचे आंधारे गिळून घालायला " " पापाचा अचळु फेडायला " " पुण्याची पहाट फुटायला " श्रीकृष्णमूर्तीचें रविमंडळ जगदाकाशाच्या क्षितिजावर उदय पावलें—प्रगटलें ! " आपुल्याचेनि कैवारें " तो भक्तवत्सल परमात्मा आज " साकार होऊनि अवतरला होता ! " " सुखाचि गुढी " जगांत " उभवायला, " " भक्तांला सात्विकाचीं दोंदें निघायला " आज " दोवरि दो भुजा घेऊन " प्रत्यक्ष लक्ष्मीवल्लभ त्या तुरुंगांत अवतीर्ण झाले होते. युगायुगाचे ठायीं याच कार्यासाठीं त्या प्रभूचा अवतार होत असतो. अष्ट वर्षांची ती घनश्याम बालमूर्ति पाहून व पहातां पहातां देवकी देहभान विसरली ! ईश्वरी प्रेरणेनें ती सावध झाल्यावर तिला साहजिकच पान्हा फुटला व " मी वैकुंठनायक तुझ्या पोटीं आलों आहें. पण मी अयोनिसंभव असल्यामुळें माझ्या ह्या अष्टवर्षाच्या मूर्तीकडे पाहून तुला भिण्याचें किंवा आश्चर्य

मानण्याचें कांहींच कारण नाहीं " असें सांगणाऱ्या त्या प्रभूला लहान बालक होण्याची तिनें प्रार्थना केली. मातेची इच्छा पुरी करण्यासाठीं परमात्म्यांनीं लहान अर्भकाचें रूप घेतलें. त्याबरोबर पटकन त्यांना उचलून घेऊन देवकीनें त्यांना स्तनास लावलें ! देवकीला त्या मनमोहन बालकाचा अनिवार पान्हा आला व परमात्म्यास साकारतेचा अनिवार आनंद झाला. मातेची तृप्ति होईपर्यंत प्रभूनीं तिचें स्तनपान केलें. तेव्हां कोठें देवकीस बरें वाटलें. धन्य त्या देवकीची कूस कीं जिच्या पोटीं प्रत्यक्ष ईश्वरांनीं जन्म घ्यावा ! वसुदेवदेवकीच्या ह्या भाग्याचें कोण वर्णन करूं शकेल? देवकीचा पुत्र म्हणून 'देवकीनंदन' व वसुदेवाचा मुलगा म्हणून 'वासुदेव' अशा नांवांनीं त्या 'अनाम' ईश्वरास जग पुढें संबोधूं लागलें हें योग्यच आहे. असो.

वासुदेव पुन्हां मोठे होऊन आपल्या पित्यास म्हणाले "बाबा, आतां पुढील अनर्थपरंपरा टाळण्याच्या उपायास त्वरित लागलें पाहिजे. यासाठीं तुम्ही मला एका पाटींत घाला व गोकुळांत नेऊन नंदाच्या इथें मला ठेवा. नंदाची भार्या यशोदा ह्याच वेळीं बाळंत झाली आहे. तिला झालेल्या मुलीस आपल्या पाटींत घेऊन तुम्ही परत येथें या." "पण देवा ! हें सगळें बिनभोभाट व्हावें कसें ! बाहेर नंग्या तरवारीचा खडा पहारा, माझ्या हातापायांत बेड्या, तुरुंगाच्या द्वारास भलीं मोठीं कुलपें, यमुना नदीचा अथांग प्रवाह, तुमच्या जन्माच्या आनंदानें जणो प्रेमाश्रूंचाच पूर लोटणाऱ्या मेघांचा बाहेर पडणारा हा मुसळधार पाऊस,--देवा, या सर्व संकटांतून पार पडून मी निर्विघ्नपणें तुम्हास कसा नेऊं शकेन ?" वसुदेवानीं शंका विचारली. "बाबा, त्याची तुम्ही कांहीं काळजी करूं नका. तुम्ही मला घमेल्यांत घालून चालूं लागा म्हणजे झालें. आटपा लवकर!" ज्या प्रभूच्या ध्यानांत हजारों योगी वर्षांनुवर्षे गुंगून पडतात त्या सांवळ्या प्रभूच्या बालमूर्तीचा विरह होणार ही कल्पना कोणाचें हृदय हेलावणार नाहीं ? त्यांतून वसुदेवदेवकीसारख्या आपल्या डोळ्यांदेखत सहा पुत्रांचा अमानुष खून पाहिलेल्या व त्या दुःखतापानें तप्त झालेल्या हळव्या हृदयाच्या दांपत्यास तर ती विरहकल्पना किती जाणवली असेल--त्यांच्या डोळ्यांतून किती अश्रुधारा वाहिल्या असतील याची कल्पना करणेंहि कठीण आहे. मातापित्यांच्या शोकाचा पहिला आवेग शमल्यावर देव त्यांचें समाधान करीत म्हणतात "बाबा, अशा रीतीनें तुम्ही शोक करीत बसल्यास आपल्या पुढील कार्यास उशीर नाहीं का होणार ? बरें, मी कांहीं फारसा लांब जात आहें असेंहि नाहीं. बाबा,

तुमच्या, आईच्या व सर्वांच्याच कल्याणासाठीं मला गोकुळास जावयास नको काय? चला तर शोक आवरा. हं, हें पहा मी पुन्हां बालरूप होतों! आटपा! " असें म्हणून देवानीं खरोखरच बालमूर्ति धारण केली. मोठ्या कष्टानें त्या दंपत्यानें आपला शोक आवरता घेतला. स्वातंत्र्याच्या दर्शनानें कोण बेभान होत नाहीं?–तन्मय होत नाहीं? तसेंच स्वातंत्र्याचा विरह कोणास रडवीत नाहीं? मग आमच्या वसुदेव-देवकींची तशी स्थिति झाली असल्यास त्यांत आश्चर्य तें काय? पण शेवटीं भावी गोष्टीवर व ईश्वरी वचनावर विश्वास ठेवून त्या नवराबायकोनीं आपला शोक आंवरला; देवकीनें हुंदके देत पुन्हां एकदां त्या श्यामसुंदर गोजिरवाण्या प्रभूस स्तनाशीं घेतलें–प्रभूनीं शेवटचें मातृस्तनपान केलें. आपल्या जिवाचा कलिजा--पंचप्राण वांचवावा, आपल्या प्रीतिलतेवर फुललेलें हें शेवटचें फूल तरी निदान त्या निर्दयाच्या हातांत न पडावें असें साहजिकच देवकीस वाटून ती " या बाळाला कसेंहि करून वांचवाच " असें आपल्या भर्त्यास म्हणाली. वसुदेवाच्याहि मनांत तें होतेंच. शिवाय दोघांसही ईश्वरी आदेशाचें वरीलप्रमाणें आश्वासन मिळालें होतें. तेव्हां विलंब न लावतां " कंसभयानें वसुदेवानें " त्या सुंदर बालकास " नंद यशोदे वाहण्या " साठीं पाटींत घातलें व पाटी डोक्यावर ठेवली. त्याबरोबर त्याच्या पायांतील शृंखला खळ्कन् गळून पडल्या! स्वातंत्र्य ज्यानें मस्तकीं धारण केलें त्याच्या पायांत दास्याच्या बेड्या कोठून राहणार? वसुदेव तुरुंगाच्या दाराशीं आल्याबरोबर त्याचीं भक्कम कुलपें सुद्धां गळून पडलीं! जिवंत स्वातंत्र्याचा मार्ग निर्जीव वस्तु कुठवर अडवणार? वसुदेव बाहेर येऊन भयभीत मुद्रेनें इकडे तिकडे पाहतो तों एरवीं डोळ्यांत तेल घालून पहारा करीत " आलबेल " देणारे पहारेकरी डाराडूर घोरत आहेत! स्वातंत्र्योदयाचे काळीं अशाच 'मी मी' म्हणणारास सुद्धां मोहनिद्रेच्या झपाट्यांत–चैतन्यशून्य झोंपा लागून स्वातंत्र्याचा अनिरुद्ध संचार होत असतो! तेव्हां वरील रीतीनें वसुदेव बाहेर पडून यमुनेच्या मार्गास लागला हें ठीकच झालें. वसुदेवानें क्षणैक आकाशाकडे पाहिलें तों मघांचा तो मुसळधार पाऊस कोठच्या कोठें पार नाहींसा होऊन आकाश निरभ्र झालें होतें व त्यांत लक्षावधि तारकांचा नाच सुरू होता. सर्वत्र शांततेचें साम्राज्य पसरलें होतें. दूरवर यमुनेच्या जलाचा नाच चालला होता, त्याचा खळखळाटध्वनि त्या प्रशांत वेळीं गंभीरपणें ऐकूं येत होता. आज स्वातंत्र्याचा जन्म झाला म्हणूनच कीं काय चंद्रनक्षत्रांची व यमुनाजलाची स्वतंत्र सृष्टि आनंदानें नाचत होती. परंतु बांकीचे--परवशतेच्या दास्यांत लोळणारे मथुरें-

तील इतर जीव निद्रावश झाले होते ! त्रैलोक्यनाथ वैकुंठाधिपति आज साकार होऊन अवतरले म्हणून प्रमुदित झालेल्या निसर्गानें काजव्यांच्या झगझगाटाचा जागोजाग दीपोत्सव केला; व मेघांनीं वर्षिलेले प्रेमाश्रूंचे बिंदु वृक्षही आपल्या पर्णांवरून टप्‌टप् गाळूं लागले !

पुढें जाण्यापूर्वी वाचकांस हेंही सांगितलें पाहिजे कीं, ज्या चिन्मयस्वातंत्र्य-मूर्तीला वसुदेव मस्तकीं धारण करून यमुनेकडे चालला होता तें बालक देवकीच्या गर्भारपणीं तिच्या पोटांत असतांना देवकीस चिन्मयस्वातंत्र्याचेच डोहाळे लागले होते व त्या बालकाच्या भावी पराक्रमाच्या भावना ती तन्मयपणें बोलत होती. " कुठें आहे तो दुष्ट कंस! आणा त्याला इकडे. आत्ता त्याला ठार करतों ! पृथ्वीचा छळ करणाऱ्या दुष्टांचा सत्यनास केल्याशिवाय मी कधीं रहायचा नाहीं ! आणा, आणा त्या कंसाला इकडे. ये ह्मणावं माझ्यापुढें कीं तुझीं हाडेंच पिचून टाकतों ! दुष्टा ! साधूंचा छळ करतोस नाहीं का ? पतिव्रतांची अब्रू घेऊं पहातोस काय ? गोमातेचा वध करायला प्रवृत्त झालास काय ? घे तर त्याचें हें प्रायश्चित्त ! " असें म्हणून देवकी एखाद्या ' प्रेषिता ' सारखी खरोखरच तिच्या दिव्य दृष्टीसमोर भासणाऱ्या कंसास मारण्यास धांवे व तिला आवरतां आवरतां व शांत करतां करतां वसुदेवास पुरेवाट होई ! हिचें हें असलें बडबडणें कंसाच्या कानावर जाऊन आतांच कांहीं अनर्थ ओढवतो कीं काय अशी बिचाऱ्या वसुदेवास क्षणोक्षणीं धास्ती वाटे. अशातऱ्हेनें गर्भावस्थेपासूनच आपल्या पराक्रमाची चुणुक दाखवणारें बालक सध्यां वसुदेवाच्या डोक्यावरील पाटींत सुखानें " आत्मानंदीं " त मग्न होऊन पडलें होतें ! कौसल्येसही रामाच्या वेळेस असेच डोहाळे लागून "कुठे आहे तो दुष्ट रावण ! " इत्यादि रीतीनें ती बोलत असे व काल्पनिक रावणास मारण्यास धांवत असे. त्यावेळेस तिला आवरतां आवरतां तिच्या दासींची व दशरथाची अशीच तिरपिट उडत असे. गर्भारपणच्या डोहाळ्यांवरून भावी मुलाची कल्पना होते म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं. असो.

त्या बालकास डोक्यावर घेऊन वसुदेव तुरुंगाच्या बाहेर पडला—स्वातंत्र्याच्या मोकळ्या मैदानांत आला तेव्हां त्यास किती आनंद झाला असेल याची वाचकांनींच कल्पना करावी! वसुदेवानें क्षणैक वर पाहिलें ! आकाशप्रांगणांत लक्षावधि नक्षत्रें स्वातंत्र्यगीत गात नाचत होतीं. त्यानें समोर दृष्टि फेंकली ! नक्षत्रांच्या अंधुक प्रकाशांत आपणासमोर यमुना नदी कलकलरवानें तेंच स्वातंत्र्यसंगीत गात नाचत जात

असलेली त्याला दिसली ! निशीथकालीन वायूच्या स्वतंत्रलहरी त्याच्या अंगावरून वहात होत्या ! खालीं वर व आसपास स्वातंत्र्याचा हा रम्य देखावा पाहून त्याच्या शरीरावर हर्षरोमांच उठले ! 'इतक्या दिवस मी केवढ्या दिव्य सुखास अंतरलों होतों' हा विचार त्याचे मनांत येऊन व तुरुंगांतला तो भयाण देखावा दृष्टीपुढें येऊन त्यानें एक लांब सुस्कारा सोडला. व आनंदित आणि उल्हासित मनानें तो पुढें चालूं लागला. " अहाहा ! स्वातंत्र्याचा केवढा हा निर्भेळ आनंद !" वाट चालत असतां वसुदेवाच्या हृदयसागरावर त्याच स्वातंत्र्याच्या विचारलहरी उठत होत्या " त्या आनंदापुढें सर्व सुखें खरोखर तुच्छ आहेत. स्वातंत्र्याच्या झोंपडींतील ओलीकोरडी भाकर ही पारतंत्र्याच्या प्रासादांतल्या पंचपक्वान्नाहूनहि अधिक रुचिकर लागते म्हणतात तें किती खरें आहे !" वसुदेव अशा रितीनें अंतर्बाह्य स्वातंत्र्यानें भरून राहिला. त्याचें हृदय स्वतंत्र, देह स्वतंत्र, मस्तकीं स्वातंत्र्यमूर्ति, आकाशांत व आजूबाजूस स्वतंत्र निसर्गाचा दिव्य आनंद ! अशा रितीनें सगळीकडे स्वातंत्र्याचें दिव्य दृश्य दिसत होतें ! श्रीकृष्णचरित्र लिहावयास बसलेले आम्ही स्वातंत्र्याच्या या गोष्टी करतांना पाहून कित्येकांस आश्चर्य वाटेल. पण त्याला आम्ही तरी काय करणार? कारण श्रीकृष्णाचें चरित्र ह्मणजे स्वातंत्र्याचें संगीत, चैतन्याचें गायन, सौंदर्याचा विलास व प्रेमाचें दिव्य मोहन आहे ! किंबहुना एकाच चित्कलेच्या ह्या चार प्रभा आहेत ! व त्यांचा जो इतिहास तेंच त्या प्रेममयाचें चरित्र असल्यामुळें आम्हींहि त्यांत रंगून जावें हें साहजिक आहे. अस्तु.

झपाझप पावलें टाकीत वसुदेव यमुनानदीतटाकीं येऊन उभा राहिला. रात्रीं एक वाजण्याचा समय होता. सर्वत्र शांत निस्तब्धता वास करीत होती. निशीथकालीन वायूच्या मंद शीतल लहरी वहात होत्या ! आकाशांत पसरलेल्या लक्षावधि तारकांच्या मंद प्रकाशांत यमुनानदीचें पात्र अंधुक दिसत होतें. निशावायूच्या लहरी जललहरी कंपित करीत होत्या. यमुना दुथडी भरून वहात होती. वसुदेवानें क्षणैक चौफेर दृष्टी फेंकली ! दूरवर त्याला आपण बाहेर पडलों त्या तुरुंगाचे तट अंधुक अंधुक दिसत होते ! वसुदेवानें नेसत्या धोतराची कांस मारून पुन्हां ती पाटी डोक्यावर घेतली व परमेश्वराचें चिंतन करीत बेधडक यमुनेंत पाय घातला. व शक्य तितक्या जलदीनें तो पाणी तोडीत चालला. कारण त्यास अजून बरेंच कार्य उरकायचें होतें. पण आज यमुनेनें जणो त्याला अडविण्याचाच विचार केला होता कीं काय असें त्याला वाटलें. कारण तो जसजसा पुढें जाऊं लागला तसतसें यमुनेचें पाणी भराभर

चढूं लागलें व लवकरच तें त्याच्या गळ्याशीं घेऊन भिडलें ! यमुनेचा खरोखरच वसुदेवास अडविण्याचा विचार होता काय ? छे ! स्वातंत्र्याच्या दिव्य संगीताचे आलाप छेडणारी नदी स्वातंत्र्यमूर्तीच्या निर्गमनाचे प्रसंगीं आड येईल असें होईल तरी कसें ? स्वतंत्र जीवांना इतर स्वतंत्र जीव भेटले असतां उलट आनंदच होतो, व हर्षनिर्भर होऊन ते त्यास आलिंगन देण्यास धांवत असतात–त्याला आनंदानें सामोरे जातात. साकार बनलेली स्वातंत्र्याची चिन्मय मूर्ति पाहून स्वतंत्र यमुनेच्या हृदयांत त्याच हर्षलहरी उठत होत्या ! व ती वसुदेवास अडविण्यास नव्हे तर प्रभूचें स्वागत करण्यास, त्याच्या पायावर आनंदानें लोळण घेण्यास, पारतंत्र्याच्या दुष्ट नरकांत गरीब जीवांस पचविणाऱ्या राक्षसांच्या मस्तकावर पदाघात करणाऱ्या प्रभूच्या स्वातंत्र्यप्रिय चरणकमलांचें दर्शन घेण्यास–ती जणो पुढें–वरवर–सरकत होती—येत होती. स्वातंत्र्योपभोगी आकाशांतील तिच्या तारकामैत्रिणी प्रभुरायाचें दिव्य दर्शन अनिमिष नयनांनीं—आपल्या लुकलुकणाऱ्या डोळ्यांनीं अतृप्तपणें घेत असतां यमुनानदीस तें घेतल्यावांचून कसें राहवेल ? इतकेंच नव्हे तर आकाशोद्यानांत फुललेलीं तीं हजारों हंसरीं फुलें जणों स्वर्गस्थ देवांनीं त्या प्रेममय परमेश्वराच्या अंगावर उधळण्यासाठीं–निदान त्याच्या चरणावर वहाण्यासाठीं म्हणून नदीच्या पात्रांत लोटून दिलीं होतीं ! व यमुना त्यांना आपल्या ओंजळींत घेऊन त्या स्वातंत्र्याच्या पुष्पांनीं त्या प्रेममयाची पूजा करण्यासाठीं-त्याच्या चरणावर तीं वाहण्यासाठीं-प्रभुरायाच्या चरणाजवळ जवळ येऊं पहात होती ! परंतु तिच्या ह्या आनंदाच्या तन्मयवृत्तींत गरीब बिचाऱ्या वसुदेवाचा मात्र जीव गुदमरण्याची वेळ आली ! प्रभूनीं आपल्या वडिलांवरील प्रसंग जाणला; तसेंच यमुनेच्या हृदयांत उठणाऱ्या काव्यमय तरंगांचीही त्यांना ओळख पटली व त्यांनीं आपला पाय हलकेंच पण पटकन् पाटीबाहेर टाकला ! झालें; स्वातंत्र्याचें दर्शन झालें ! बरोबर आणलेलीं फुलें यमुनेनें त्या विश्ववंद्य चरणांवर उधळलीं !--वाहिलीं. प्रभूची त्यांनीं पूजा केली; स्वतंत्र यमुनेनें स्वतंत्र प्रभूचें स्वतंत्र पुष्पांनीं पूजन केलें, तेव्हां तिचें भरून आलेलें हृदय ओसरलें व नंतर हर्षनिर्भर हृदयानें अवाप्तकाम होऊन तिनें मोठ्या प्रेमानें व आनंदानें स्वातंत्र्यनिर्गमनास वाट दिली-यमुनेचें जल दोन बाजूंस विभागलें गेलें. यमुना जणों प्रभूच्या जाण्यास मार्ग व्हावा म्हणून आपलें जलवस्त्र सांवरूनच उभी राहिली ! वाट झाल्याबरोबर मिळालेल्या मार्गानें वसुदेव झपाट्यानें निघाला व लवकरच गोकुळींच्या परिसरांत येऊन उभा राहिला. भावनाप्रधान गोकुळां-

तील वातावरणांत शिरल्याबरोबर वसुदेवास कांहीं अलौकिकच सुख होऊं लागलें ! कृष्णकन्हय्याच्या श्यामसुंदर देहानीं जेथील वृक्षपाषाणही विमोहित झाले, जेथील सर्व चराचर सृष्टि एखाद्या मंत्रमुग्ध नागाप्रमाणें ज्या प्रभूच्या मुरलीरवानें भविष्यत्कालांत गुंगून गेली त्या उत्तानभावनांनीं भरलेल्या व भारलेल्या गोकुळांत आल्याबरोबर वसुदेवास कांहीं अननुभूतच अशा भावनांचें सौख्य होऊं लागलें ! "अहाहा ! किती हें वातावरण रमणीय ! भावनाप्रधान जीवांचें हें रम्य वसतिस्थान माझ्या बालकाच्या--स्वातंत्र्याच्या—वाढीस योग्य ठिकाण आहे यांत तिळमात्र शंका नाहीं. मथुरेच्या पारतंत्र्यांतील त्या कोंदट हवेपेक्षां हें रमणीय स्थलच त्या प्रभूच्या निवासास योग्य आहे. " बाळ ! तुमच्या, आईच्या व सर्वांच्याच कल्याणासाठीं मला गोकुळांत जाऊन रहावयास नको काय ? " हें तुझें म्हणणें अगदीं यथार्थ आहे ! " वसुदेवाच्या हृदयांत विचारलहरी उठत होत्या.

वसुदेव लवकरच नंदगृहाजवळ येऊन ठेपला. सर्वत्र शांत निस्तब्धता वसत होती. वसुदेव हलकेंच पाय न वाजवितां बाळंतिणीच्या खोलींत शिरला. खोलींत एका खाटेवर यशोदा प्रसवमूर्च्छेंत आपल्या लहानग्या बालिकेस जवळ-स्तनाशीं-घेऊन निजली होती ! मातृस्तनपानाच्या दिव्य आनंदांत गुंगतां गुंगतां ती बालिका निद्रित होऊन तिच्या मुखांतील स्तन सुटून वेगळा झाला होता ! निद्रिस्त यशोदेचा बालिकेच्या अंगावरील हात ढिला पडला होता ! जवळच एक दोन दासी निजल्या होत्या. खोलींत एक लामण दिवा मंद मंद जळत होता ! वसुदेव यशोदेच्या बाजेजवळ जाऊन उभा राहिला, व त्यानें आपल्या मस्तकावरील पाटी खालीं उतरून ठेवली ! त्यानें पाटींत पाहिलें तों प्रभुरायाची बालमूर्ति निद्रानंदांत मग्न झालेली त्याला दिसली ! प्रभुरायास खरीच झोंप लागली होती काय ? छे, प्रभुराज झोंपल्यावर विश्वाचा गाडा चालणें तरी शक्य आहे काय ? परमात्मा निजल्यावर सर्वांनाच काळझोंप घ्यावी लागेल, विश्वयंत्रांतील चक्रांची उलथापालथ होईल. श्रीकृष्णाची बालमूर्ति निजानंदांत रंगून स्वस्थ पहुडली होती. पण आमच्या वसुदेवास मायेमुळें आपलें बाळ निजलें आहे असेंच वाटलें. वसुदेवास व पुढें यशोदेस परमात्म्यांनीं आपलें परमात्मत्व कितीही पटवलें. तरी ' मायेनें ' पुनः पुन्हां ' विमोहित ' होऊन त्यांना तो मानवी बालकच वाटे. असो. वसुदेवानीं हलकेच त्या बालकबालिकेची अदलाबदल केली. आपल्या पोटच्या गोळ्यास यशोदेच्या खाटेवर निजवितांना व यशोदेची बालिका आपल्या पाटींत घेतांना त्यास

किती भडभडून आलें असेल-किती जड हातानीं केवळ ईश्वराज्ञा म्हणून त्यांनीं तें काम केलें असेल याची वाचकांनींच कल्पना करावी. यशोदेच्या बाजेवर पहुडलेल्या त्या श्यामसुंदर प्रभूच्या कमनीय मुखमंडलाकडे वसुदेवानें एकदां शेवटची दृष्टि टाकली ! त्याला अनिवार प्रेमाचा हुंदका दाटून आला, कंठ गहिंवरला, नेत्रांतून अश्रुधारा वाहूं लागल्या ! आपल्या प्रिय बालकाचें त्यांनीं शेवटचें चुंबन घेतलें. त्याबरोबर प्रभुरायांनीं आपले नेत्रकमल उघडले व अत्यंत स्निग्ध व प्रेमळपणें ते आपल्या पित्याकडे पाहूं लागले ! अहाहा ! त्या नेत्रांत जी प्रेमाची जादू भरली होती तिचें कोठवर वर्णन करावें ? “ बाळा ! तुला माझ्या चुंबनानें त्रास झाला काय रे ? ” कंठ गहिंवरून येऊन स्फुंदत स्फुंदत हलक्या आवाजांत वसुदेव म्हणाले, “ नीज बाळा ! सुखानें नीज. बाळ ! तुला टाकून मला आतां जावें लागणार, या कल्पनेनें माझ्या हृदयाची किती कालवाकालव होत आहे याची तुला काय कल्पना ? बाळ ! येतों बरं मी. ईश्वर ( ! ) तुझें सदैव कल्याण करो असा माझा तुला आशीर्वाद आहे ” असें म्हणून वसुदेवानीं आपला हात प्रभूच्या मस्तकीं ठेवला. प्रभुराय गालांतल्या गालांत हंसले ! तें पाहून प्रभुस्वरूपाची पुन्हां आठवण होऊन आपल्या आशीर्वादांतील रम्य भोळेपणा लक्षांत येऊन वसुदेव त्यांतल्यात्यांत हंसून म्हणतो “ देवा ! मग त्यांत काय झालें मोठेंसें ! ‘ काडवातीनें सूर्यास ओवाळीत ’ नाहींतका ? त्यांतलाच आपला माझा आशीर्वाद समजा ! ” असें म्हणून व जास्त गडबड करणें युक्त नाहीं हें लक्षांत येऊन वसुदेवानें ती बालिकेची पाटी मोठ्या कष्टानें डोक्यावर घेतली व अत्यंत जड पावलांनीं तो त्या स्वातंत्र्यसदनांतून बाहेर पडला ! “ देवा ! ” वसुदेव वाट चालतां चालतां स्वताशींच म्हणाला “ स्वधर्माचें रक्षण करण्यास व अधर्माचा पाडाव करण्यास, ‘ पतिव्रतांचे पाठीराखे परमेश्वर ! ’ आपण इथेंच रहा व नंदाच्या येथील गोरसावर यथेच्छ बलवान होऊन कंस–चाणूरादि दुष्टांच्या त्रासानें पृथ्वी गांजून गेली आहे तिला त्यापासून मुक्त करा ! ”

अत्यंत मंदपणें पावलें टाकीत वसुदेव त्याच यमुनेच्या तीरीं येऊन उभा राहिला ! स्वातंत्र्याचा वियोग झाल्यामुळेंच कीं काय नदीचें पात्र ओसरून जाऊन यमुना आतां मघाच्या जोरानें वहात नव्हती ! वसुदेवानें मोठ्या कष्टानें नदींत पाय घातला व तो कसबसा पैलतीरास आला. आपण जसजसे स्वातंत्र्यापासून दूर दूर जात आहों तसतसें पारतंत्र्याच्या भीषण तुरुंगाचें द्वार आपण जवळ करीत आहों याची त्यास पदोपदीं

जाणीव होऊं लागली. त्याचीं पावलें जड पडूं लागलीं. शेवटीं मोठ्या कष्टानें तो तुरुंगाच्या द्वाराजवळ आला. पहांटेची वेळ झाली होती. पहारेकरी अद्याप प्रभात-कालीन साखरझोंपेंत गुंग होऊन पडले होते--निद्रिस्तच होते. वसुदेवानें कष्टाचा शेवटचा सुस्कारा टाकला व त्यानें आपलें पाऊल तुरुंगांत ठेवलें. त्याबरोबर तुरुंगाच्या दरवाजाला कुलूप पडलें. त्यानें आपल्या कोठडींत पाय टाकल्यावर त्याच्या पायाला बेड्या बिलगल्या ! पुन्हां पूर्वींसारखा जसा होता तसा बंदोबस्त झाला ! स्वातंत्र्यास दूर करणाऱ्याच्या पायांत अशाच बेड्या पडत असतात. असो.

लवकरच दुसरा दिवस उगवला. सूर्याच्या कोमल ताम्र किरणांनीं तुरुंगांतील पहारेकऱ्यांस व राजमहालांतील कंसास एकदमच जागें केलें. " क्यौं बे ! क्या घोर निद्रा लगी थी " असें पुटपुटत ते डोळे चोळीत उठतात तों आदिमायेचा-त्या बालिकेचा " क्यांहा क्यांहा " असा रुदनस्वर त्यांच्या कानीं पडला. आदिमाया खरेंच रडत होती ? छे, तिला कंसाच्या हातून आपली शक्य तितकी लवकर सुट-का करून घ्यायची होती. पण पहारेकऱ्यांस कळलें तर पाहिजेना कीं आपण आंत जन्मास आलों आहों तें ? म्हणून हें रुदनाचें मिष होतें. अस्तु. त्या रुदनस्वर श्रवणाबरोबर पहारेकऱ्यांनीं कोठडींत डोकावून पाहिलें तों देवकी एका रम्य बालि-केस स्तनपान करीत आहे. ते लगेच कंसाकडे वार्ता देण्यास धांवले. कंस ती बातमी ऐकून खडबडून उठला. नवव्या महिन्यापूर्वीच देवकी बाळंत झाली याचें त्यास आश्चर्य वाटलें. " कायरे काय झालें ? देवकी बाळंत होऊन तिला काय झालें ? " अधीरतेनें कंसानें विचारलें. " सरकार ! तिला लडकी झाली आहे ! " पहारेकऱ्यांनीं अदबीनें उत्तर दिलें. " केव्हांशी ती बाळंत झालीरे ? " कंसा-नें अंगावर कपडे चढवीत पुन्हां विचारलें. पहारेकरी गोंधळले. पण वसुदेवाच्या वाड्याकडे उत्कंठेनें धांवतच निघालेल्या कंसाच्या तें लक्षांत आलें नाहीं. बिचाऱ्या-च्या मनाची आजची तळमळ काय विचारतां ? कंस लवकरच तुरुंगांत आला व पहातो तों खरेंच देवकीला " लडकी " झाली आहे. त्या निर्दयानें हीच मला मार-णारी असें समजून तिला क्रूरपणानें आईपासून ओढलें. देवकीनें " ती पोर आहे, तिला मारूं नकोस; कंसा, आजवर तूं माझीं सहा मुलें मारलींस, आतां एवढी पोर तरी जिवंत ठेवरे, " असें पुष्कळ गयावया केलें, परोपरीनें शोक केला; पण तो पातकी तिळभरही द्रवला नाहीं. त्यानें त्या लहानग्या बालिकेचा तो चिमुकला पाय धरून तिला त्या शिळेवर—सहा अर्भकांच्या मृत्यूचे आघात सहन करून मूक रुदन करणाऱ्या त्या

शिळेवर—आपटण्यासाठीं तो तिला आकाशांत गरगर फिरवूं लागला; पण हा काय चमत्कार? ती पहा—ती पोर-ती आदिमाया कंसाच्या हातून वरच्यावर आकाशांत झटकली—विजेसारखा झक प्रकाश पडून वर पाहणाऱ्या कंसाचे डोळे दिपले--व भीतीनें थरथर कापणाऱ्या कंसास "दुष्टा! मला मारण्याचें सामर्थ्य तुझ्यासारख्या क्षुद्र धुंगुरट्याचें नाहीं. ही पहा मी चाललें! पण तुझा शत्रु--देवकीचा आठवा मुलगा --गोकुळांत नंदाच्या इथें सुखानें वाढत आहे; तो 'आठवा' तुझें पुरें कंदन उडवल्याखेरीज कधीं राहणार नाहीं. याद राखून रहा! तुझें आयुष्य संपुष्टांत आलें आहे!" अशी खणखणीत आकाशवाणी ऐकूं आली. ती ऐकून कंसाची कंबरच खचली, त्याच्या हृदयाचा थरकांप उडाला, जिभेला कोरड पडली, डोकें फिरूं लागलें, व तो मटकन् खालींच बसला! नंतर हळूहळूं तो शुद्धीवर आला, तथापि त्या झगझगगीत पोरीच्या—देवी कुमारीच्या--त्या तेजोमयी वाणीबरोबर--आपल्या दिव्य तेजाची प्रभा फांकीत जाणाऱ्या त्या विंध्यवासिनीच्या उद्गाराबरोबर--त्याच्या अंगांतली हिंमत, उत्साह व आनंद पार मावळला; व अज्ञात व अदृश्य अशा शक्तीचे काळपाश जणूं काय आपल्या गळ्याभोंवतीं कोणीतरी अडकवून आपणास मृत्यूच्यां कराल दाढेंत खेंचून नेत आहे असें वाटून त्याचें धैर्य पार गळालें, तोंड सुकून गेलें व त्यास जिकडे तिकडें "आठवा" दिसूं लागला! व त्या भीतियुक्त पश्चात्तप्त स्थितींत त्यानें देवकीची माफी मागून त्या दंपत्यास ताबडतोब बंधमुक्त केलें.

घराकडे परत जातांना कंसाच्या मनांत सारखें धसधसत होतें. आपण इतका बंदोबस्त ठेवला असून अखेर शत्रु निसटला, 'पक्षी पळाला' हें पाहून त्यास राग, भीति व संताप आला. व त्याच वैतागलेल्या स्थितींत आपल्या पहारेकऱ्यांचीच या कामीं हयगय झाली आहे असें समजून त्या दुष्टानें त्याच सपाट्यांत त्यांना फांशी दिलें व दुःखानें मनगटें चावीत तो आपल्या वाड्यांत परत आला! पण वाचक! याच वेळीं तिकडे गोकुळांत काय मौज उडून राहिली आहे व केवढा आनंद पसरला आहे तें पहाण्याची तुम्हास साहाजिकच उत्सुकता झाली असेल. तर चला, तुम्हांस तिकडेच नेतों.



# भाग दुसरा.

वाचक ! तें पाहिलेंत का गोकुळ? गोवर्धन पर्वताच्या पायथ्याशीं वसलेल्या त्या गोकुळाचें कुठवर वर्णन करावें ? तो झुळझुळ वाहणारा वारा, ते उंचउंच वृक्ष व त्यावरील पक्ष्यांचा किलबिलाट, गाईंचा तो हंबारव, आणि उंच सदृढ असा तो गोपगोपींचा समाज, त्या झोंपड्या, ते गाडे, तीं अंगणें या सर्वांची मौज कांहीं औरच होती. झुलपें ठेवलेलीं व दारोदार खेळणारीं तीं गवळ्यांचीं पोरें व गाईचीं वासरें ह्यांच्या चैतन्यानें गोकुळांत नवजीवन भरून राहिलें होतें. प्रभातकालीन आरक्त रविमंडळानें आपलीं कोमल ताम्र किरणें यशोदेच्या खोलीच्या गवाक्षांतून आंत पाठवून तिला जागृत केलें. यशोदा जागी होऊन पहाते तों आपणास एक अत्यंत कमनीय बालक झालें असून तें आपल्या हंसऱ्या कपोलानें व नेत्रानें आपल्याकडे पहात पडलें आहे ! त्याकडे पहातांच यशोदा इतकी तन्मय झाली कीं तिची तंद्रीच लागायची वेळ आली. पहिल्याच दृष्टिपाताबरोबर जन्मभर जगास झुलविण्याची जादू त्या जगन्नियंत्यावांचून इतर कोणास साधणार आहे ! यशोदा लवकरच शुद्धीवर येऊन जवळच निजलेल्या आपल्या दासीस हाक मारून त्या गोजिरवाण्या सुंदर बालकास दाखवीत म्हणते " श्यामे ! पाहिलेंस का किती सुंदर बाळ आहे तें ? मला पहिल्याच खेपेस मुलगा झाला ही परमेश्वराची आपणावर किती कृपा ! " इतक्यांत प्रभुराजानीं मंदहास्य केलें. " गुलामा ! हंसतोस का ? चहाटळ कुठचा ! " यशोदा ह्मणाली " पण श्यामे, किती ग माझं बाळ गोजिरवाणं व सुंदर आहे ! " असें म्हणून आलेला पान्हा पाजण्यास प्रभूला यशोदेनें स्तनाशीं घेतलें. मुलीच्या जन्मापेक्षां मुलाचा जन्म असा आनंददायक असतो व त्याच आनंदानें सर्व गोकुळ भरलें. कारण लवकरच ही बातमी नंदराजाच्या-नंद हा सर्व गवळ्यांचा मुख्य, सर्वांत श्रीमंत व सुखी असल्यामुळें त्यास नंदराज म्हणत असत--व सर्व गोकुळांतलि गोपगोपींच्या कानावर जाऊन नंदाच्या त्या मनमोहन लेकरास पाहण्यास सर्व गोकुळ लोटलें ! नंदानें पुत्रजन्मानिमित्त मोठा आनंदोत्सव केला. बाराव्या दिवशीं बारसें मोठें थाटांत करून मुलाचें नांव त्याच्या सावळ्या वर्णानुरूप ( श्री ) ' कृष्ण ' असें ठेवण्यांत आलें. यदुवंशीय क्षत्रिय सरदाराचे पोटीं येऊन वैश्यांतहि दुर्मिळ असा सांवळा वर्ण प्रभूनीं कां बरें

धारण केला ? जगताचें पाप क्षालन करतां करतां प्रभु सांवळे झाले काय ? अथवा आपल्या मातापित्याची कोणास शंका येऊं नये म्हणून तर ती सांवळी तनू त्यानीं धारण केली नसेलना ? हालाहाल विषपान करून शंकराचा कंठ काळा-निळा झाला. शंकरांनींही ज्याचें चिंतन करावें त्याचा सर्व देहच जगाच्या पापाच्या आगीची धग शांत करतां करतां काळा पडावा हें साहजिकच आहे. असो. अशा रीतीनें ' अनामा ' चा नामकरण विधि झाल्यावर म्हाताऱ्या बायाबापड्यांनीं त्याजवरून लिंबलोण उतरलें, त्याची दृष्ट काढली, त्याला अंगारे लावले व " इडा पिडा टळो, अमंगळ पळो " असें म्हणून त्यानीं आपल्या कानशिलावर बोटें मोडून घेतलीं ! ह्या सर्व अद्भुत प्रकाराचें अर्थात् देवास हंसूं येत होतें. पण करतात काय ! मानवी देहाबरोबर मानवी संस्कार व सोहोळेही अनुभवले पाहिजेतच. त्याला उपाय काय ? असो. अशा रीतीनें श्रीकृष्णजन्माचे चार दिवस गोकुळवासीजनांस मोठ्या आनंदांत गेले.

नंदाच्या घरीं वसुदेवानें आणून ठेवलेल्या रोहिणीस—वसुदेवाच्या दुसऱ्या भार्येस—यापूर्वीच पुत्ररत्न झालें असून त्याचें नांव ' राम ' असें ठेविलें होतें. त्यास ' संकर्षण ' असेंही म्हणत. रोहिणी आणि यशोदा दोघींनींही आपल्या ' रामकृष्णा ' च्या बाल्यावस्थेंतील निरुपम प्रेमसुख अनुभवलें. " तान्हयां निकें तें माऊलीसीच करणें " अशा अवस्थेंत त्या अनन्यस्तनंधय बालकावर मातेचें--जगांतील यच्चावत् मातेचें--किती निरुपम प्रेम असतें व त्यांत दैवी कारुण्याची झांक कशी पावलोपावलीं चमकत असते हें कोणास सांगावयास पाहिजे ? त्यांना न्हाऊ माखूं घालतांना, पाळण्यांत निजवून ' अंगाई गीतें ' गातांना, त्यांना कडेवर घेऊन हिंडतांना आपल्या अजातपक्ष पाखरांचे मातांना किती कौतुक वाटतें व त्या हंसऱ्या बालकाकडे तन्मयवृत्तीनें पहात असतां मातेच्या स्निग्ध दृष्टींत किती प्रेमळपणा सांठविलेला असतो व जगाच्या मोलाचा हा ठेवा कुठें ठेवूं आणि कुठें नको ठेवूं असें त्यास कसें होऊन जातें याची साक्ष प्रत्येक माता देऊं शकेल. आमच्या यशोदेची तीच अवस्था झाली. हळूहळू भगवान् रांगूं लागले. डाव्या गुडघ्यानें गाईच्या गोठ्यांत रांगत जाणाऱ्या त्या कन्हय्याच्या श्यामसुंदर मूर्तीस आवरतां आवरतां तिला पुरेवाट होई. ' रजोमलिन काय ' अशा त्या प्रभूला ' पोटिशीं ' धरतांना यशोदेला किती आनंद होत असेल व धन्य वाटत असेल याची कल्पना " धन्यास्तदंगरजसा मलिनी भवंति " म्हणणाऱ्या दुष्यंताच्या उद्गारावरून वाचकास येईलच. असो. मातेचें स्तनपान कर-

तांना सुद्धां मध्येंच थांबून मातेकडे बघत त्याच दुग्धाचा फूत्कार सोडून तो घनश्याम परमात्मा मातेस रिझवीत असे. पंतानीं राम प्रभूच्या बाल्यावस्थेचें वर्णन करतांना "पीतां स्तनातें क्षणमात्र राहणें। मह्यादरें मातृमुखासि पाहणें। वक्त्रांत तें दुग्ध तसेंचि वाहणें। येणेंचि फूत्कार करोनि नाहणें॥ मुखांतुनी दुग्ध गळे सुनिर्मळ। उरावरी ये अति शुभ्र वोगळ। मंदाकिनीचा गगनीं प्रवाह तो। चंद्र प्रभा पांडुर काय वाहतो" इत्यादि केलेलें वर्णन कृष्ण प्रभूसही तितकेंच लागू पडत नाहीं असें कोण म्हणेल ?

इकडे आपल्या कंसाची स्थिति काय होती ? तो जरी वरकरणीं हास्य दाखवी तरी त्याच्या हृदयांत भयानें धडकीच भरली होती. त्यांत आपल्या शत्रूचें बारसें होऊन त्याचें " कृष्ण " हें नांव ठेवलेलें ऐकल्यापासून तर त्याला सगळीकडे कृष्णच दिसूं लागला ! जळीं, स्थळीं, काष्ठीं, पाषाणीं सगळीकडे कृष्ण दिसूं लागला. गोकुळांत स्वतः जाऊन कृष्णाला मारून टाकण्याचें धाडस त्याच्यानें करवेना. कारण त्याला पक्कें ठाऊक होतें कीं आपण गोकुळांत पाय ठेवला कीं आपलीं शंभर वर्षें पुरीं भरलींच म्हणून समजावीं ! यासाठीं आपलें मरण जिथवर टळेल तिथवर टाळावें व त्या अवधींत सापाचें पिलूं मोठें झालें नाहीं तोंच त्यास ठेचण्याचा--झाडाचें रोपटें लहान आहे तोंच तें खुडून टाकण्याचा, कृष्णास ठार मारण्याचाहि प्रयत्न आपल्या हस्तकाकरवीं मधून मधून करीत असावा असा त्यांनीं डाव रचला व प्रथम ' पूतना ' या नांवाची एक राक्षसीण कृष्णास मारण्यास धाडून दिली.

पूतनेनें सुंदर व्रजस्त्रीचें रूप धारण केलें व आपल्या स्तनांतून विष भरून तें कृष्णास पाजायला घेण्याच्या निमित्तानें पाजावें म्हणून मोठ्या साळसूदपणानें ती नंदाच्या घरीं यशोदेकडे आली, व " कसं काय यशोदे ! काय म्हणतो आहे तुझा कान्हा ? फार खेळकर आहेना ? पाहूं बाई एकदा त्याला ! किती पाहिलं व किती घेतलं तरी पुरेंच वाटत नाहीं ! " असें म्हणून पटकन् तिनें त्या सर्वज्ञ बालकास उचलून घेतलें. यशोदा आंत कामांत गुंतली होती. तिच्याकडे श्रीकृष्णाच्या श्यामसुंदर मूर्तीस खेळवण्यासाठीं दररोज कितीतरी व्रजांगना हौशीनें येत असत. कृष्णकन्हय्याच्या आकर्षक मोहिनीचे पाश एव्हांपासूनच त्यांस खेंचून यशोदागृहीं आणीत होते. अस्तु. तेव्हां त्यांतलीच ही एक असेल असें समजून " हो बाई ! भारीच लबाड झाला आहे. " असें उत्तर देऊन यशोदा पुन्हां आपल्या कामांत मग्न झाली. इकडे पूतनेनें ही संधि बरी आहे असें पाहून हळूच त्या चिन्मय बालकास पदराखालीं घेतलें व आपले ' विषकुंभ ' असे पयोधर त्याच्या तोंडांत दिले. ' मृत्यू-

लाही मृत्यु देणाऱ्या ' परमात्म्यास असल्या क्षुद्र उपायानें काय होणार ? ज्याच्या कृपेनें " विषमप्यमृतं क्वचित् भवेत् " त्याला विष काय बाधा करूं शकणार ? त्यानें तें पूतनेचे स्तन तिच्या इच्छेनुसार चोखण्यास आरंभ केला व ते इतके सपाटून चोखले कीं त्याबरोबर प्रभूनीं तिचे प्राणही शोषले. तिच्या स्तनास तिडीक लागली व हातपाय झाडीत त्या वेदनांनीं ती शेवटीं धाडकन गतप्राण होऊन पडली ! " नयनें फिरवी, झाडी करचरण, म्हणे पुरे, रडे, तदपी । न करी पुरे, न सोडी, गोडी आणोनि असुहि मास्पद पी ॥ ' मोठा शब्द करोनी क्षितिवरी साक्रोस पूतना पडली " असें पंतांनींही त्याचें वर्णन केलें आहे. " मला विष पाजून ठार मारणार होतीस नाहीं का ? भोग आतां आपल्या पापाचें फळ ! " देव स्वतांशींच म्हणाले. इतक्यांत त्या राक्षसीच्या धाड्कन पडण्याच्या आवाजानें यशोदा बाहेर धांवून आली व पहाते तों हा प्रकार. " परमेश्वराच्या कृपेनेंच (!) हें अरिष्ट टळलें " असें वाटून तिचा जीव खालीं पडला. व तिनें आमच्या बालपणींच पराक्रम गाजविणाऱ्या प्रभूस प्रेमानें उचलून पोटाशीं धरलें व त्याची दृष्ट काढली !

अशा रीतीनें पूतनेची व्यवस्था लागल्यावर कंसास फार वाईट वाटलें. कारण त्यानें मोठ्या उमेदीनें पुतनेस पाठविलें होतें व तिनेंहि " मी बिनहरकत काम करत्यें तुम्ही कांहीं काळजी करूं नका " असें सांगितल्यावरून एव्हांनीं आपला शत्रु-कृष्ण-त्या विषप्रयोगांनीं मेला सुद्धां असेल अशा गुळचट आशेच्या मनोराज्यांत कंस गुंग झाला होता. पण पूतनेच्या मृत्यूची बातमी येऊन पोंचल्याबरोबर— या ' प्रथमग्रासे मक्षिकापाता ' नें— त्या मनोराज्यांतील भव्य मनोरे कोंसळून जमीनदोस्त झाले व पुन्हां वस्तुस्थितीचें भयाण चित्र त्याच्यापुढें ' आ ' पसरून उभें राहिलें ! तथापि तो जातीचाच दुष्ट असल्यामुळें एवढ्या तेवढ्या यत्नवैफल्यानें तो डगमगणारा नव्हता. त्यानें लगेच " मावळभटास " बोलावून आणलें व त्यास पुन्हां कृष्णहननाच्या कामगिरीवर पाठविलें. मावळभटही कंसाचाच भट तो ! तो तडक निघाला व ज्योतिषी सामुद्रिक बनून त्यानें यशोदेच्या घरीं प्रवेश करून घेतला व श्रीकृष्णाचे हातावरून सामुद्रिक पाहण्याचे मिषानें तो त्यास ठार मारणार होता. वास्तविक गर्गाचार्यांनीं पूर्वीच कृष्णाचें जातक वर्तवून त्या श्यामसुंदर प्रभूच्या श्रीवत्सलांछनादिक चिन्हांवरून हा साक्षात् ईश्वरावतार आहे असें सांगितलेंच होतें. पण हात दाखवण्याचें व पत्रिका पाहण्याचें वेड मोठें अनावर असतें ! त्यांतून प्रभु एकुलते एक व यशोदेचें लाडकें बालक ! मग काय विचारतां ? पण ईश्वराचा अवतार ईश्व-

राच्या इच्छेवांचून थोडाच समाप्त होणार ? अद्याप श्रीकृष्णांचें बाल्य होतें. अजून त्यांना कंसासारखीं कित्येक धेंडें लोळवायचीं होतीं. असल्या शेंकडों माबळभटांनीं श्रीकृष्णाचा एक केंस सुद्धां वांकडा झाला नसता. असो. माबळभटाचा तो उद्देश जाणून श्रीकृष्णांनीं लवकरच त्याला यमसदनीं पाठविलें हें सांगणें नकोच ! त्याच्याच पाठोपाठ कंसांनीं धाडलेल्या " तृणावर्त " व " शकटासुर " ह्या राक्षसांचीही रामकृष्णांनीं अशीच गच्छंति केली ! तेव्हां कंस मनांत फार ' खोंचला '–खिन्न झाला ! व त्यानें तो प्रयत्न कांहीं दिवस सोडून दिला.

इकडे बालकृष्णाची नयनमनोहर मूर्ति दिवसेंदिवस शुक्लेंदुसारखी वाढत होती व आपल्या विविध लीलांनीं सर्व गोकुळास आनंद देत होती. त्यांनीं गाई–वांसरांच्या शेंपट्याच ओढाव्या, त्यांना दाव्यासून सोडूनच द्यावें, लोकांच्या येथील दहीं-दूध, लोणी चोरून खावें, शिंक्यावर असल्यास मडकें फोडून खालीं पडेल तें व तें सुद्धां एकटे नाहीं तर वाकड्या, पेंद्या इत्यादि सवंगड्यांसह खावें. याप्रमाणें नाना लीलांनीं त्यांनीं सर्व गोकुळास पुरेंपुरेसें करून सोडलें. " पहा पहा गे तुझा मुरारी। दह्यादुधाची करितो चोरी " ह्याप्रमाणें रोज " यशोदातल्लीं " कडे व्रजांगना गाऱ्हाणें येऊन सांगूं लागल्या. पण मौज ही कीं त्यामुळें त्यांचें प्रेम मात्र श्रीकृष्णावर अधिकाधिक वाढतच चाललें. कारण तीं गाऱ्हाणीं ऐकून सावासारखा जवळ येऊन उभ्या राहिलेल्या कृष्णास यशोदा जर रागें भरूं लागली तर त्याच उलट तीस म्हणत " जाऊं देग यशोदे; त्यांत काय आहे ? लहानपणीं मुलांनीं अशाच खोड्या केल्या पाहिजेत. आपल्याला दह्या दुधाला काय कमी आहे ईश्वराच्या कृपेनें ( ! ). आपल्या घरीं मुबलक दहीं दूध आहे. " नंतर श्रीकृष्णाकडे वांकड्या डोळ्यांनीं पहात " खा म्हणावं त्या लबाडाला किती खातोस तें ! " असें त्या पुढें म्हणत असत. असो. याप्रमाणें नानाप्रकारच्या खोड्यांनीं आमचे भगवान् गोकुळांस नको नकोसें करून सोडीत. एकदां तर त्यांची मजल एका गोपीच्या वेणीची तिच्या भ्रताराच्या दाढीशीं गांठ मारून त्याची मौज पहाण्यापर्यंत गेली होती म्हणतात. दुसरे दिवशीं सकाळीं तें लफडें यशोदेकडे निवाड्याला आल्यावर कृष्णाला हंसतां हंसतां पुरेवाट झाली. असो. पण या सर्वांबद्दल यशोदेच्या हातून कृष्णास एकदां चांगलेंच शासन व्हायचा प्रसंग आला. तो असा:—

यशोदा एकदां ताक करीत व एकीकडे कन्हय्यालाल कृष्णाच्या सुंदर बालमूर्तीचें ध्यान करीत बसली होती. ताक घुसळतांना अंगास बसणाऱ्या हेलकाव्याबरोबर

तिच्या मस्तकावरील फुलें जमिनीवर गळून पडत होतीं. पण त्याच वेळीं बाळकृष्णाविषयींच्या अपत्यप्रेमसमाधींत ती इतकी बुडून गेलेली होती कीं, त्या फुलांबरोबर त्यांच्याच इतके पवित्र, कोमल, मृदु व मनाला उन्नति देणारे असे प्रेमाश्रु तिच्या नेत्रांतून गळत होते ! इतक्या तन्मयावस्थेंत परमात्मा तरी आपल्या भक्ताला कसा विसरेल ? तावडतोब दुडदुड धांवणाऱ्या बालकृष्णानें मागून येऊन यशोदेच्या हातांतली रवी धरली ! " गळती नेत्रांतूनी प्रेमाश्रुजळें, फुलें शिराहूनी । ऐसें मंथन करितां श्रीकृष्ण धरी रवीस बाहूंनीं " असें पंतांनींही त्याचें रम्य वर्णन केलें आहे. पण आपल्यावर यशोदेचें खरें प्रेम किती आहे याची पारख करण्याचेंच आज प्रभूनीं ठरविलें होतें म्हणून त्यांनीं तिला त्यावेळीं प्यावयास मागितलें. तें तिनें दिलें. याप्रमाणें यशोदा कृष्णाला पाजीत बसली होती; समोरच अग्नीवर दूध तापत होतें. श्रीकृष्णानीं यशोदेची परीक्षा पाहण्यासाठीं मातृस्तनपान करतां करतां हलकेंच डोळ्यांनीं अग्नीला वाढण्याची–प्रज्वलित होण्याची खूण केली. यजमानांची आज्ञा झाल्याबरोबर हुकमाचा तावेदार हुताशनी धडधड जळूं लागला व क्षणार्धांत चुलीवरील दूध उतूं जाऊं लागलें. इतक्यांत " अगबाई, दूध उतूं चाललें वाटतें " असें म्हणून जगदीशास चट्दिशी मांडीवरून खालीं लोटून देऊन यशोदा त्या दुधाकडे धांवली ! " अरेरे, मातोश्री " देव स्वताशींच म्हणतात " एकूण माझ्यापेक्षां तुमचें दुधावर जास्त प्रेम आहे तर ! " पण स्वस्वरूपाचें अज्ञान असलें म्हणजे अशा गोष्टी व्हायच्याच. अथवा स्त्रीस्वभावच असा काय ? स्वर्गाला जाणाऱ्या तुकोबांनीं अगदीं शेवटीं सुद्धां आपल्या भार्येस आपल्याबरोबर वैकुंठास चलण्याची विनंति केली असतां त्यांची पत्नी जिजाई संसारांतच कशी गुरफटून राहिली हें आपणास ठाऊकच आहे. तसाच कांहींसा प्रकार इथेंही झाला. अस्तु. पण त्यानें श्रीकृष्णास राग आला. आपणास पाजीत असतां अर्धवट टाकून यशोदा उठली याचा त्यांस राग येऊन ( दामोदरत्व पत्करण्यासाठीं ) त्यांनीं त्याच रवीनें त्या रागाच्या सपाट्यांत समोरचें मडकें फोडलें ! त्यावेळेस यशोदेच्या रागास काय विचारतां ? " थांब हं कृष्णा, तूं अलीकडे फार माजला आहेस, ज्याचीं त्याचीं तूं मडकीं फोडतोस ! थांब तुला एकदां चांगलेंच चवदावें रत्न दाखवलें पाहिजे. त्याशिवाय नाहीं तूं वठणीवर यायचास ! " असें म्हणून जवळच पडलेली कामटी उचलून यशोदा कृष्णाला मारण्यास धांवली; तों तो गुलाम केव्हांच धूम पळाला होता. पण यशोदेनें आज जणों श्रीकृष्णशासनाचा निश्चयच केला होता ! कारण, ती तशीच त्याच्या पाठीस लागली व दोघांची धांवपळ

सुरू झाली. पण परमात्मा तिच्या हातीं थोडेच सांपडतात ! ते चपळांतले चपळ ! यशोदेला धांवतां धांवतां दम लागला. या धांवपळीचा धिंगाणा मागल्या परसांत चालला होता. यशोदा दमून धांपा टाकूं लागली. आतां मातेचा अंत न पाहतां तिच्या हातीं लागावें व ती पुढें काय करते तें तर पहावें असें ठरवून देव शेवटीं उभे राहिले. तेव्हां लगेच यशोदेनें त्याला धरून "गुलामा ! सांपडलास कीं नाहीं शेवटीं (!)" असें म्हटलें. इथें जातां जातां परमेश्वरप्राप्तीच्या मार्गांत अशा धापा टाकण्याची वेळ येऊन दम लागेपर्यंत परिश्रम करावे लागतात व शेवटीं हताश अवस्थेंत परमेश्वराच्या कृपेनेंच परमात्मा "धांवतो"-हातीं सांपडतो हें देवांनीं दाखवून दिलें आहे. असो. यशोदा कृष्णाचे अंगावर काठी उगारून पुढें म्हणते, "लबाडा ! तुला फार खोड्या करायला पाहिजेत नाहींका ? आं ? करशील का पुन्हां खोड्या ?" पण श्रीकृष्णाची ती केंविलवाणी मुद्रा पाहून मातेच्या हातांतून छडी गळून पडली ! पंत ह्मणतात "यष्टि उगारी जों कर धरुनि करें तों तदश्रुतनुकंपा। पाहे, राहे ताडण, वारी त्या गोपिकेसि अनुकंपा !" "आई नाहींग ! मी नाहीं पुन्हां खोड्या करणार !" देव काकुळतीनें म्हणाले. तेव्हां यशोदा पुढें म्हणते "बरं तर. पण थांब. तसा नाहीं तूं ऐकायचास. तुला कांहीं तरी शिक्षा केलीच पाहिजे. तुला आतां घराबाहेरच कांहीं वेळ पडूं देत नाहीं, थांब !" असें ह्मणून तिनें जवळच पडलेल्या दाव्यांनीं श्रीकृष्णाला उखळीला बांधून टाकण्याचा विचार केला ! पण अहंकारानें मी कोणचीही गोष्ट करीन म्हटलें कीं त्यांत अपेश ठेवलेलेंच ! अहंकार विसरून तन्मय होऊन ईश्वरास जेव्हां शरण जावें तेव्हां कार्यभाग होत असतो हें तत्व इथेंहि देवानीं दाखवून दिलेंच. जी पळतांना गोष्ट तीच बांधतांना. धांवतांना जेव्हां यशोदेचा अहंकार गळाला व ती अगदीं मेटाकुटीस आली तेव्हां देव तिच्या स्वाधीन झाले ! तरीहि तिला गर्व होऊन "सांपडलास कीं नाहीं गुलामा शेवटीं माझ्या हातीं" असें ती ह्मणालीच. ह्या अहंकाराची गम्मत ही अशी आहे ! तो परमार्थमार्गावरील अगदीं शेवटच्या पल्ल्यापर्यंत सुद्धां आपणास सोडीत नाहीं. "नवल अहंकाराची गोठी। विशेषें नलगे अज्ञानापाठीं। सज्ञानाचे झोंबे कंठीं। नाना संकटीं नाचवी' असें ज्ञानोबा ह्मणतात तें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. वास्तविक कर्ता करविता तोच असल्यामुळें व त्याच्याच कृपेनें त्याची प्राप्ति होत असल्यामुळें ज्ञानाची "फुंज" किती चुकीची आहे! पण हें पहावें कोणीं ? अस्तु.

तेव्हां यशोदेनें तें दावें उचलून त्यानें श्रीकृष्णाला बांधून टाकण्याचा विचार केला व ती त्याला--सर्व विश्वाला मायेच्या बंधानें बांधणाऱ्या गोविंदास--बांधूं लागली. पण परमेश्वराचें स्वरूप म्हणजे " तुका म्हणे व्यापक नभा । होई अणूचाही गाभा " असें असल्यामुळें तें त्यांच्याच इच्छेवांचून दोरीच्या बंधांत कसें सांपडावें--अडकावें ? दोरी चार बोटें कमी पडूं लागली. म्हणून यशोदेनें दुसरें दावें घेऊन पहिल्यास जोडलें व बांधूं लागली तों पुन्हां आपलें चार बोटें कमी ! अशा रीतीनें पांच पंचवीस दावीं बांधल्यावर यशोदा थकली व कंटाळली. तेव्हां देवांनीं शेवटीं आपणांस बांधून घेतलें तेव्हां यशोदेस " शेवटीं बांधलें बाई एकदाचें ! " म्हणून आनंद झाला व दाव्याचें दुसरें टोंक निर्जीव अशा उखळीस तिनें बांधून टाकलें. निर्जीव बिचारी उखळी तिला काय प्रतिकार करणार ? पण सजीव सचेतन प्राण्यास बांधणें तितकें सोपें नसतें. मग परमात्मा तर चैतन्यस्वरूपच. पण भक्तीच्या व प्रेमाच्या बंधनानें असा निर्बंध-ईश्वरही बांधला जातो. अस्तु. याप्रमाणें कृष्णास उखळाशीं बांधून व " धांव आतां कसा धांवतोस तें " असें रागानें म्हणत यशोदा घरांत निघून गेली.

श्रीकृष्णास " दामोदर " बनवून-- ' ज्याच्या उदरास दाम म्हणजे दावें (बांधलें) आहे ' असा याचा अर्थ; व परमेश्वरास हें नांव वरील प्रसंगावरूनच पडलें असावें हें चाणाक्ष वाचकांच्या लक्षांत आलेंच असेल--यशोदा घरांत कामास निघून गेल्यावर ' आईनें आपणास वासरासारखें बांधलें ' ह्याच आनंदांत बापडा श्रीकृष्ण वासरा-प्रमाणें हातापायांवर फिरूं लागला ! अपराधाबद्दल होणाऱ्या शिक्षेचें भानही नसणारा बाल्यावस्थेंतला अंतर्बाह्य आनंदानें भरलेला जीव त्या शिक्षेंतच कसा आनंद शोधीत असतो–कारण अपराधाचीच जेथें जाणीव नाहीं तेथें शिक्षेचें महत्त्व तरी काय वाट-णार ?--ह्याचें चित्र प्रभूनीं येथें किती नामी रेखाटलें आहे ? असो. कृष्णजींची स्वारी त्या उखळासकट सरकत सरकत--कारण चैतन्याला अचेतन वस्तू कोठवर अवरोध करणार--आपल्या अवतारकृत्यांतील एक उद्धाराचें कार्य करण्यासाठीं, त्या परसांत उगवलेल्या यमलार्जुनांची मुक्तता करण्यासाठीं त्यांच्या--त्या दोन वृक्षांच्या मधून पलीकडे गेली. त्याबरोबर ते वृक्ष उन्मळून पडले व त्यांतून दोन नलकूबर गंधर्व निर्माण होऊन आपल्या मुक्ततेबद्दल त्यांनीं हात जोडून प्रभूचें स्तुतिस्तोत्र गायिलें, व नंतर प्रभूच्या आज्ञेनें ते आपल्या गंधर्व लोकास निघून गेले. यमलार्जुनांच्या उन्म-ळून पडण्यानें जो धाड्दिशी आवाज झाला त्याबरोबर नंदयशोदा घाबरून परसांत धांवत आलीं व " अगबाई ! माझं बाळ तर दगावलं नाहींना ? " म्हणत यशोदा

पाहूं लागली. नंद यशोदा दोघेही परसांत येऊन पहातात तों दोन अर्जुनवृक्ष उन्मळून पडले आहेत व बाळकृष्णाची श्यामसुंदर मूर्ति दाव्याउखळीसकट पलीकडे हंसत बसली आहे ! " हें काय ग ! याला या दाव्यांनीं कोणीं ग बांधलें ? " नंदांनीं आश्चर्यानें प्रश्न केला. कारण नवऱ्याला नकळत, नंदाच्या पश्चात्, तो बाहेर गेला असतांना इकडे यशोदेनें कृष्णास ही शिक्षा केली होती ! " भारीच गुलाम खोड्या करीत होता म्हणून ठेवलें होतें बांधून उखळीला घटकाभर ! " यशोदा म्हणाली. " अग पण हो. म्हणून काय झालें ? त्याला ही शिक्षा ? आत्तां तो त्या झाडाखालीं सांपडता म्हणजे पोर दगावताना ? देवांनीं ( ! ) खैर केली म्हणून थोडक्यांत बचावलें. छे ! छे ! तुम्हांला बायकांना अगदीं सुमारच नसतो कोणच्याही गोष्टीचा म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं. " यशोदेचा अपराध होता खराच. तेव्हां ती काय बोलणार ? " हं चल, सोड त्याचें दावें. बाळाचें सुकुमार अंग त्यानें करकचून सुद्धां गेलें असेल ! लोक मुलं होत नाहींत म्हणून देवाला नवस करतात अन् पिंपळाचे पार झिजवीत असतात. पण देवाच्या दयेनें हिला कसा सुंदर गोजिरवाणा मुलगा मिळाला असून हिला आहे कां त्याची कांहीं किंमत ? " असें कृष्णप्रेमानें म्हणत नंदानीं स्वतःच बाळकृष्णाची त्या दामबंधनांतून सुटका केली ! पस्तावलेली यशोदाही " कृष्णा, मी तुला आतां कधीं अशी शिक्षा करणार नाहीं " असें म्हणाली व त्याचें चुंबन घेऊन त्या माउलीनें त्यास प्रेमानें पोटाशीं धरलें व त्यास ' प्रेमपान्हा ' दिला. याप्रमाणें आमचे कृष्णजी पुन्हां खोड्या करायला मोकळे झाले !

यशोदेला श्रीकृष्णानीं आपलें परमात्मत्व एक दोनदां पटवून दिलें होतें म्हणून मागें सांगण्यांत आलें आहे; ते प्रसंग असेः– एकदां श्रीकृष्णांनीं माती खाल्ली होती. तेव्हां " माती खातोस का ? थांब हं. तुला मार दिला पाहिजे " म्हणून यशोदेनें त्याचा हात पकडला. तेव्हां " नाहींग आई, ही पहा मीं कुठें माती खाल्ली आहे ? " असें म्हणून देवानीं आपलें तोंड उघडलें व त्यांत चौदा भुवनें--सर्व विश्व दाखविलें. तेव्हां यशोदा थक्कीत झाली ! तसेंच दुसऱ्या एका प्रसंगीं चतुर्थीच्या दिवशीं गणपतीसाठीं करून ठेवलेले मोदक व लाडू कन्हय्यालालानीं चटकावले असतांना तिला तें उमगलें नाहीं व ती शिक्षा करण्यास प्रवृत्त झाली असतां पुन्हां विश्वदर्शन करून त्यांत हजारों गणपति त्या मुखांत बसलेले तिला त्यांस दाखवावे लागले. नामदेव म्हणतात " कृष्णनाथें तेव्हां मुख पसरिलें । ब्रह्मांड देखिलें मुखामाजी । असंख्य गणपति दिसती वदनीं । पहातसे नयनीं यशोदा ते । मुखांतून गणपति मातेसी बोलत ।

पुजावें त्वरित हरीलागीं " पण साफ झालेल्या पाण्यावर पुनः पुनः " बाभुळी "— शेवाळें—वाढावें तसें तिच्या निवळलेल्या दृष्टींवर पुनः पुनः मायेचें पटल पडत असे— अथवा प्रभु तें घालीत असत ! आणि म्हणूनच अशा प्रकारानंतर " यशोदा हरींसी कडेवर घेत। मुखातें चुंबीत आवडीनें " असाच वारंवार प्रकार घडे. असो.

याप्रमाणें श्रीकृष्ण हळुहळू सहासात वर्षांचा झाला तेव्हां तो गवळ्याचा पोर असल्यामुळें " तुला झालें तर पहा " असें म्हणून नंदानें आपल्या येथील गाईवांसरांना रानांत यमुनेच्या तीरीं चरावयास नेण्याचें काम त्याला सांगितलें. गोपालकृष्णांना गोपालन किती प्रिय होतें तें काय सांगायला पाहिजे ? सकाळ झाली-- " रविचक्र निघो आलें-- " " सुंदर उषःकाल झाला "—कीं यशोदेनें आपल्या प्रिय बालकांस उठवावें-- हाक मारून जागे करावें. " कृष्णा! " इतका वेळ निजलासी म्हणुनि हरि कळेल नंदाला. " तर ऊठ लवकर. त्या पहा गोपी सडासंमार्जन करून रांगोळी घालून " शृंगार सुशोभित "अशा यमुनाजल आणण्यास निघाल्यासुद्धां. " पलांडु मर्दुनि तिखट वनविलें घेइ शिदोरी बांधली. " हे पहा, तुझे सवंगडी तुला हांक मारायला आले आहेत. " असें म्हणून यशोदेनें कांबळी, यष्टि, वहाणा इ. त्याला द्यावें. या प्रमाणें श्रीकृष्णाची स्वारी गोधन सोडून रोज त्यांना वनांत चरायला नेत असे. त्या वेळेस वनांत-- कुंजवनांत गवत मुबलक असे. त्यावर यथेच्छ चरून जवळच असलेल्या यमुनेचें जल प्राशन करून गायी पुष्ट बनत व त्यांच्या गोरसावर व्रजांची स्थितिही स्पृहणीय असे. दुर्योधन दुष्ट असूनही त्याची राज्यव्यवस्था जशी चांगली होती असें म्हणतात तसेंच कंस इतका दुष्ट होता तरी त्याच्या राज्यांत " रिझर्व्हड फॉरेस्ट लॉज " म्हणजे ' राखीव जंगलांचे नियम ' नसत. त्यामुळें गायी चारण्यास कोणच्याही तऱ्हेचा त्रास नसे.

हळुहळू ' रामकृष्ण ' दहाबारा वर्षांचे झाले. नीलवस्त्र परिधान केलेला ' गौरांग ' राम व पीतवसनधारी श्यामसुंदर कन्हयालाल यांची जोडी गळ्यांत वनमाला घालून, डोकीवर मोरपिसांचे मुकुट लेवून, आणि हातांत काठ्या घेऊन जेव्हां गायी चारण्यास जात तेव्हां सशक्त, सुंदर, सुहास्य वदनाच्या त्या रामकृष्णांच्या मूर्ति किती शोभत असतील-- त्यांतल्यात्यांत कृष्णाच्या लोभनीय मूर्तीकडे पाहून गोकुळवासी गोपगोपींची दृष्टि किती लुब्ध होऊन जात असेल याची वाचकांनींच कल्पना करावी !

पण त्याचें आमच्या कंसाला काय ? त्या दुष्ट कंसास वाचक विसरले नसतीलच. व तो कंसही श्रीकृष्णाला विसरला नव्हता. यद्यपि पूतना, माबळभट इत्यादिकांच्या

मृत्यूनें वाईट वाटून तो थोडा वेळ खिन्न झाला होता तरी आतां पुन्हां --कृष्ण रानांत गुरें चारावयास नेऊं लागला ही बातमी त्यास कळल्यावर—रामकृष्णांस व फार तर त्यांच्या सवंगड्यांस रानांत-- कुंजवनांत—एकटेच गांठून अनेक राक्षसांची धाड त्यांवर एकामागून एक धाडण्याचा त्यानें निश्चय केला. श्रीकृष्णजींचा उद्देशही रानांत जाऊन केवळ गायी चारण्याचा केव्हांही नव्हताच. तर त्या निमित्तानें व अन्य रीतीनें "पोटांत भाव वधणें अघदुर्जनातें " — आपणास आढळणाऱ्या ' अघदुर्जनांचा वध करणें ' हाही एक अवतारकार्यानुरूप त्यांत मुख्य उद्देश असेच.

तो ' कुंजवनविहारा ' चा प्रसंग होता ! आदल्या दिवशींच श्रीकृष्णांनीं आपल्या सवंगड्यांस ' रात्रींच सिद्ध करणें अशनादि शिंकी ' — दुसऱ्या दिवसासाठीं छानदार शिदोरी तयार करून ठेवा म्हणून सांगितलें व दुसऱ्या दिवशीं प्रातःकाल झाल्याबरोबर प्रभुराज उठले; त्यांनीं आपली " शृंगी " --छोटेंसें शिंग-- फुंकून आपली " मित्रसेना " जागृत केली. यशोदेनीं कृष्णास जागें करावें हें लौकिकी बोलणें आहे. " मायेच्या घोर निद्रेंतूनही जागृति ज्याच्या कृपेवांचून होत नाहीं " त्यास इतरांनीं काय जागें करावें ? असो. याप्रमाणें मित्रसेना जागृत करून व आपापल्या शिदोऱ्या घेऊन कृष्णप्रभूची स्वारी गाईवांसरांना सोडून वनभोजनासाठीं कुंजवनाकडे निघाली. ज्याच्या प्रकाशानें " चंद्रसूर्य डोळस " झाले त्या प्रभूच्या वदनावर व देहावर सवित्याचीं कोमल ताम्र किरणें पसरून त्यांची शोभा वृद्धिंगत करूं लागलीं ! प्रातर्वायूच्या मंदशीतल लहरींच्या आनंदांत मित्रगण—' मित्रा ' स नमस्कार करून--चालूं लागला. सर्व मंडळी यमुनातीरीं आली. गाईवांसरांना चरायला सोडून देऊन त्यांचे नाना तऱ्हेचे खेळ सुरूं झाले. ' गुंजमाळां ' चे हार त्यांनीं ' गळां ' घातले. गायनाच्या लकेऱ्या मारल्या. श्रीकृष्णाला प्रथम शिवण्याचा खेळ ते खेळले. वृक्षावरून उड्या मारणाऱ्या मर्कटांच्या बरोबर धांवून त्यांना ' वांकुल्या ' दाखवून त्यांनीं आपली करमणूक करून घेतली. यमुनाजलांत पोहणाऱ्या हंसांच्या गतींचें--त्या " राजहंसांच्या चालण्याचें—" या मानवी राजहंसांनीं--परम हंसावस्थेप्रत पोंचलेल्या त्या राजस बाळांनीं अनुकरण केलें. नदीतटाकीं ध्यानस्थ बसलेल्या बकांच्या " अभ्यासमुद्रे " ची त्यांनीं नकल केली व अशा नाना लीलांनीं " गडी हांसवीती कृपेच्या समुद्रा " -- त्या कृपासागर परमात्यास त्यांनीं हंसविलें. "श्रीकृष्णाची ती श्यामसुंदर मूर्ति पाहून-तो घननीलवर्ण पाहून-मोर चकले व ते त्यापुढें आनंदानें नाचूं लागले !" त्यांचेंच अनुकरण मुलांनींही केलें. असो. हळुहळू ऊन वाढत

चाललें. शेवटीं सूर्य मध्यान्हीवर आल्यावर श्रीकृष्णांनीं सर्व गाईवांसरांस झाडांच्या सावलींत आणलें. व मग नदीकांठीं असणाऱ्या एका प्रशस्त वृक्षाच्या घनदाट छायेंत बसून सर्व सवंगड्यांसह त्यांनीं आनंदानें भोजन केलें. ती श्यामसुंदर मूर्ति भोजनास बसली त्या वेळचा आनंद काय वर्णावा ? नादब्रह्मानें सर्व जगास झुलवणारी आपली ' वंशी '--मुरली--वेळूचा पांवा--श्रीकृष्णांनीं कंबरेस खोंवला, डाव्या काखेंत शिंगाजवळ आपली सुंदरशी ' वेताटिही गोमटी '--सुंदरशी वेताची छडी--ठेवून दिली व चंदनाची उटी ज्याच्या सर्वांगास लावली आहे, ' घवघवीत पिवळा पाटोळा ' ज्यानें नेसला आहे, मयूर पिच्छानें युक्त असा देदीप्यमान किरीट ज्याच्या मस्तकीं शोभत आहे, वैजयंतिमालिका ज्याच्या गळ्यांत रुळत आहे, ' मकरकुंडलें ' ज्याच्या ' श्रवणीं तळपत ' आहेत--कानांत झळकत आहेत असा तो ' मनमोहन मुरलीवाला ' श्रीकृष्ण--सर्व जगाला वेड लावून सोडणारा तो कन्हयाश्याम ज्यावेळीं भोजनास बसला व त्यांनीं जो आनंद लुटला त्याचें कोठवर वर्णन करावें ? प्रभूचें तें चंद्रवदन पहाण्यास ' सर्वदृष्टी ' सदा ' भुकेल्या ' असत--त्याच्या वदनावर त्या नेहेमीं खिळलेल्या असत, यासाठीं, त्या सर्वचकोरास चंद्रदर्शन होण्यासाठीं प्रभूनीं आपलें आसन मध्यभागीं ' कर्णिकेच्या स्थळीं '--मांडलें व आपणांभोंवतीं ' अंभोज पत्रां ' प्रमाणें--कमलदलाप्रमाणें--सर्व मित्रसेना अर्ध चंद्राकार बसवली व परमेश्वरानीं दहीभाताचे घांस मोठ्या प्रेमानें प्रत्येकाच्या तोंडांत घातले. अहाहा ! ह्या सुखाचा हेवा कोणास वाटणार नाहीं ? त्या परमानंदाचें कौतुक किती सांगावें ? ज्या प्रभूच्या कृपेचा लवशेष मिळावा म्हणून योगीजन हाडांचीं काडें करीत असतात, ब्रह्मादि देव ज्या सुखासाठीं तळमळत असतात, त्या प्रभूचें सहवाससुख व कृपा आज गोकुळावर वर्षत आहे तेव्हां त्यांचा ' पुण्यलेखा ' कोणीं करावा ? धन्य धन्य त्या गोपी कीं ज्यांनीं करतालिका वाजवून प्रभूला 'एक पाय नाचिव रे गोविंदा । घागऱ्याच्या छंदा ' म्हणून नाचाविलें व पुढें त्याच्या अखंड सहवासाचें अलौकिक सुख अनुभविलें; तसेंच धन्य तीं गोपाळबाळें कीं ज्यांच्या प्रेमानीं वेडा होऊन--ज्यांच्या भोळ्या भावाला भुलून परमात्मा अहर्निश त्यांच्याबरोबर हंसला--खेळला--व बोलला. " त्या वनांत त्या भोजनाचा तो दिव्य आनंद दृष्टिसुखानें लुटण्यास आकाशांत देवांची दाटी झाली व आजूबाजूंचे योगी व तपस्वी यांची झिम्मड उडाली " हें साहजीकच आहे. ज्या प्रभूच्या नामानें व ध्यानानें अजूनही जीव वेडेपिसे होतात त्या प्रेममयाच्या सगुण मूर्तीचा सहवास किती

आनंदप्रद असेल याची कल्पनाच चित्त थरारून सोडते, आनंदानें गात्रें पुलकित होतात. असो.

याप्रमाणें अपार असा ' परमा रसाचा ' आनंद लुटून सांयंकाळीं सहा वाजण्याच्या सुमारास श्रीकृष्णाची स्वारी सर्व सवंगड्यांसह व गुरांवासरांसह घरीं परतली. कुंजवनाच्या सुमारें मध्यावर ते येतात तों ' अघासुर ' नांवाच्या राक्षसाची धिप्पाड मूर्ति त्यांच्यापुढें प्रकट झाली ! " कारे गवळ्याच्या पोरा ! " कृष्णास उद्देशून तो म्हणाला " आमच्या कंसाचा तूं म्हणे शत्रु आहेस ? वारे शत्रु ! " असें म्हणून तो अक्राळविक्राळ राक्षस विकटपणें एकदां खदखदां हंसला. " पण अशा शत्रूला बाळपणींच ठार मारल्यावर मग तो शत्रु काय करणार ? झाडाचें रोपच उपटून फेंकून दिल्यावर त्याचा वृक्ष कसा बनणार ? आं ? काय रे ? ये तर; चल, मुकाट्यानें मरण्यास तयार हो " असें म्हणून तो असुर त्या सुरेश्वरावर धांवला. पण झगझगीत दिव्यावर झडप घालणारा पतंग कधीं जिवंत सुटला आहे काय ? तीच गत त्या अघासुराची झाली व श्रीकृष्णाच्या हस्तें त्यास लवकरच सद्गति मिळाली. काय सद्गति मिळाली ? होय, प्रियवाचक, सद्गति मिळाली हें आमचें विधान अक्षरशः खरें आहे. कारण अंतकालीं प्रभूच्या नुसत्या नामस्मरणानें-सुद्धां जर ईश्वरभावाप्रत प्राणी जातो--कारण " अंतकालेच मामेव स्मरन्मुक्त्वा कलेवरं । यः प्रयाति स मद्भावं याति नास्त्यत्र संशयः " असें प्रभुजींचेंच गीतेंत आश्वासन आहे--तर मग त्याच प्रभूच्या हातून प्रत्यक्ष मृत्यु आला असतां तो प्राणी काय नरकांत जाईल ? हें केव्हांहि शक्य नाहीं. अघासुरच काय पण त्यानंतर मुर, कंस, चाणूर इत्यादि राक्षस व शिशुपालादि राजे जे कृष्णानीं मारले- ज्यांना ज्यांना म्हणून कृष्णाच्या हातून देहदंड मिळाला ते ते सर्व प्राणी मोक्षास गेले. रामावतारीं रामानीं मारलेले असंख्य राक्षस व खुद्द रावण हेही असेच उद्धरून गेले आहेत. " असंख्य खळ संगरीं निजकरीं तुवा मारिलें। न निष्ठुरपणें, कृपा करुनि ते भवीं तारिले " असें पंत याचसाठीं म्हणतात, " अजामिळ, अघासुर, व्रजवधू, बकी, पिंगला । अशा गति दिली " असें तेच दुसरीकडे म्हणतात. यासाठींच " परि भक्त का वैरिया व्हावें । माझियाचि " असें ज्ञानोबा म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं. " अगा वरी फोडावयालागां । लोह पडो परिसाचे अंगां। परि ते मिळतिये प्रसंगीं । सुवर्णचि होईल " ही ज्ञानोक्तीही याचीच दर्शक आहे. याचसाठीं ' कालियामर्दन ' प्रसंगीचें वर्णन करतांना " दंडप्रसंगांत कृपाच पाहे " असें शुकाचार्य

म्हणतात. अस्तु. त्या कालियाची गोष्ट ज्या वृंदावनांतील यमुनेच्या डोहांत घडली त्या वृंदावनाकडे आपण आधीं थोडक्यांत वळूं.

हंसाप्रमाणें नित्य नव्या हिरव्या गवताच्या ठिकाणीं घोषांनीं फिरावें यांतच जंगलांतील गौळवाड्याची सर्व प्रकारची मौज अशा काव्यकल्पनेची समजूत असणाऱ्या नंदगोपांनीं वरील गोष्ट झाल्यावर कांहीं दिवसांनीं आपला सुटसुटीत गौळवाडा तेथून हलवला व समुद्रवीचीप्रमाणें उसळत जाणारें तें गोकुळ वनवैपुल्य असलेल्या तत्कालीन आर्यावर्तांत उत्तरेकडे जातांजातां लवकरच ' वृंदावन ' नांवाच्या एका नवीन वनांत येऊन लागलें व तेथील शेंकडों कुरणें, कदंबवृक्षराजि, नंदनवनांतील मंदारसदृश अशीं गोवर्धनपर्वतशिखरें, घनदाट छायेचा ' भांडीर '-वृक्ष, तो यमुनेचा मध्यवर्ती प्रवाह व शीतल वायूच्या त्या सुमंद झुळका यानें संतुष्ट होऊन तें तेथेंच स्थिर झालें. ग्रीष्मऋतु सुरू असल्यामुळें आपल्या सर्व प्रेमळ सवंगड्यांसह गाई चरावयास नेणारे 'रामकृष्ण' तेथील मधुर अशीं कंदफळें भक्षण करून यमुनेचें थंडगार उदक प्राशन करीत, यमुनेंत वारंवार उड्या टाकून जलक्रीडेचें दिव्य सुख अनुभवीत, भांडीर वृक्षाखालीं कांहीं वेळ विश्रांति घेत तृणशय्येवर पडून पुन्हां हुतुतु, हमामा, विटीदांडू, कुस्त्या, झुंज, इत्यादि खेळ आपल्या सवंगड्यांशीं खेळण्यांत दंग होऊन जात व सायंकाळ झाला कीं गोधनें घराकडे वळवून सर्व मंडळींसह तो मदनमोहन भगवान् आपल्या मधुर बांसरीतून संगीताचे आलाप छेडीत घरीं परत येत असे ! याच वेळीं रामकृष्णांचें सात वर्षांचें बाल्य व चौदा वर्षांपर्यंतचें कौमार्य संपून त्यांनीं पौगंड दशेंत–तारुण्याच्या नव्या नव्हाळींत पाऊल टाकलें होतें–" यौवनाच्या देहलीवर " ते उभे राहिले होते. व त्यामुळें " बाल्याच्या कंठीं हात ठेवून तारुण्य काननांत " विहरणाऱ्या त्यांच्या आधींच सुंदर व सदृढ शरीरयष्टीस अधिकच मोहकत्व साहजीकच प्राप्त झालें–व त्यांच्यावर नजर ठरेनाशी झाली. अद्वितीय कांतीनें झळकणाऱ्या त्यांच्या मुखारविंदाकडे पहातां पहातां–त्यांतल्या त्यांत कन्हय्याच्या सौंदर्याचें दिव्य मोहनानें विमोहित झालेल्या सर्व गोकुळाची स्थिति कशी बेभान होत असेल, नंद-यशोदेच्या हृदयांत वात्सल्याचें भरतें किती दाटत असेल, आबालवृद्ध गोपगोपींस त्याचें व त्याच्या मोहक मुरलीचें कसें वेड लागून गेलें असेल व " नंदगोपसुतं देवि पतिं मे कुरु जन्मनि " म्हणून शेंकडों गोपकुमारी देवीकात्यायनीजवळ कशा अनन्य भावें प्रार्थना करीत असतील या रम्य कल्पनेचें चित्र वाचकांनींच स्वतांशीं रेखाटून

घ्यावें. पण ह्या सर्वांची दृष्टि फिरवून टाकून त्यांस अध्यात्म्याच्या दिव्य वातावरणांत घेऊन जाणारे–नेऊन सोडणारे चमत्कार याच वेळीं प्रभूनीं केलेले आहेत. त्यांतील हृदय हलवून सोडणारा प्रसंग म्हणजे कालियामर्दनाचा होय. "कालिया आख्यान स्मरे जो मानसीं। न डंखी तयासी सर्पकुळ" अशी नामदेवांनीं त्याची 'फलश्रुति' सांगितली आहे; तेव्हां आम्ही सांगतों ती कालियाची कथा, प्रियवाचक, तुम्ही "करुनि एकाग्र मन ऐका"

"कालिंदीचे डोहीं" कालिया नांवाचा भयंकर विषारी व अजस्र असा एक सर्प रहात होता. त्याचें विष इतकें भयंकर होतें कीं त्याच्या विषारी फूत्कारांच्या ज्वालांनीं यमुनेचें पाणी नुसतें कढत होतें व त्या पाण्याच्या त्या विषारी वाफेनें एकएक दोनदोन मैल उंचीवरील पक्षीसुद्धां पटापट मरून त्या यमुनेच्या डोहांत पडत असत. पाणी प्यावयास जाणारीं गाईवांसरें त्या पाण्यास तोंड लावल्याबरोबर गतप्राण होऊन पडत असत. "पक्षीश्वापदांनीं सोडिलें त्या स्थळा। निघताती ज्वाळा तया डोहीं ॥ विषाचिया योगें झाडें जळताती। जीवन न घेती कोणी त्याचें" असा हाहाकार त्या डोहाच्या आसपासच्या सृष्टींत सुरू असतांना व एकच कहर माजला तेव्हां त्या दुष्ट सर्पाचें शासन करणें जगद्धितार्थ अवतरलेल्या प्रभूकडे साहजीकपणें आलेंच. व त्यांनीं तो प्रसंगहि मोठ्या बहारीनें जुळवून आणला. तो असा कीं श्रीकृष्ण प्रभूची स्वारी एकदां त्या स्थळीं गायी चारण्यास म्हणून आपल्या गोपालसवंगड्यांसह आली. व गाईवांसरांस चरायला सोडून हुतूतू, हमामा, लपंडाव इत्यादि खेळ खेळण्यास सर्वांनीं सुरवात केली. खुद्द वैकुंठनायक आपल्या वाकड्या, पेंद्या इत्यादि मित्रांसह विटीदांडूचा खेळ खेळत होते. कालियाच्या वस्तीचें भान त्या परमात्म्यावांचून इतर कोणासच नव्हतें. डाव ऐन भरांत आले होते. ग्रीष्मऋतूंतला प्रखर सूर्य आपल्या चंडकिरणांनीं प्रकाशत होता. हळुहळु "तृषाक्रांत झाले ते गाई–गोपाळ। पिती तेव्हां जळ काळीयाचें" त्याबरोबर "झाले गतप्राण सकळांचे!" विटीदांडूच्या खेळांत रंगलेल्या वैकुंठनायकाची दृष्टि त्यांजवर गेली व "लहानलीं मुलें नाहीं तया ज्ञान" अशा अनागस बालांचें व गाईवासरांचे ते मृतदेह पाहून प्रभु हृदयीं कळवळलें व क्षणैक थांबून "नामा म्हणे तेव्हां कृपादृष्टी पहात। उठवी समस्त गाई गडी." इकडे विटीदांडूचा खेळ सुरूच होता. पण मनांतल्या मनांत "जगजेठी तेव्हां क्रोधावला चित्तीं। करीन मी शांती तुझी आतां ॥ माझिया लेकरां दिधलासी त्रास। करीन मी नाश आतां तुझा ॥ माझिया भक्तासी

जो कां दुःखदाय । करीन प्रळय त्याजवरी " असे रागाचे विचार श्रीहरीच्या मनांत येत होते व त्याबरोबर " स्फुरताती दंड कांपती अधर " असें तें प्रभूचें क्रोधकंपित ध्यान शोभत होतें ! पण वरकरणीं तसें कांहींच न दाखवितां खेळतां खळतां प्रभुनीं वाकड्याची विटी अगदीं सहज अशी त्या डोहांत पाडली व ती आणून देण्यासाठीं म्हणून श्रीकृष्ण ताबडतोब त्या डोहाकडे धांवले. आपल्या पिवळ्या झगझगीत पितांबराची कांस मारून ते झरझर त्या डोहाकांठीं असणाऱ्या कदंब वृक्षावर चढले व आंतल्या रागानें खवळून जाऊन दुष्टदमनार्थ तयार झालेल्या त्या प्रभूनीं दंड थोपटून डोहांत उडी टाकण्याची तयारी केली व " वाकड्या ! ही पहा मी तुझी विटी आणून देतों हं ! " असें म्हणून प्रभूनीं धाड्दिशीं त्या डोहांत उडी सुद्धां घेतली ! हा सर्व प्रकार इतक्या जलद--क्षणार्धांत--डोळ्याचें पातें लवतें न लवतें इतक्या अल्प काळांत झाला कीं वाकडया, पेंद्या इत्यादि प्रभूच्या सवंगड्यांस त्यांच्या पाठोपाठ धांवून त्यांना या भयंकर सा सापासून परावृत्त करण्यास त्यांना पुरता वेळही मिळाला नाहीं ! तरी त्यांतल्या त्यांत वाकडया " नको नको कृष्णा ! हें साहस करूं नको ! मला ती विटी नको, मी दुसरी आणीन " असें म्हणून प्रभुच्या पाठोपाठ धांवलाच. पण तो त्या कदंब वृक्षाजवळ जाऊन पोंचतो तों प्रभूनीं आंत उडीसुद्धां घेतली होती ! आतां काय करणार ? कोण तो भयंकर प्रसंग ! केवढें हें साहस ! सर्व सवंगडी हताश होऊन त्या डोहाचे कांठीं जमले. " घालीतसे वेढे दिसतसे जळीं । आकांत सकळीं मांडियेला ॥ गडी रडताती वत्सें पडताती । " या प्रमाणें सगळीकडे हाहाकार उडाला. " वियोगानें तेव्हां पक्षी रडताती । आतां कृष्णमूर्ति कैची आम्हां ॥ बोलोनियां ऐसे निस्तेज पडती । नद्या वाहती त्या स्थिरावल्या ॥ " इकडे गोकुळांत--वृंदावनांत वसलेल्या गोकुळांत--व्रजांत--यशोदेची अवस्था दुश्चिन्हपरंपरेनीं फार चमत्कारिक झाली. " कधि भेटेल मजला श्रीहरी " असें तिला होऊन गेलें. " जीव तळमळी दाटे माझा घास । पाहीन पाडस केव्हां आतां " असें तिला झालें व तिच्यासकट सर्व गोपगोपी कृष्णशोधार्थ निघाल्या. व येऊन पहातात तों दुःखानें विव्हळ होऊन कन्हय्याचे सवंगडी त्या डोहाचे तीरीं पडले आहेत व ती एकली श्यामसुंदर मूर्ती मात्र कोठें दिसत नाहीं ! तें पाहून नंद यशोदेनीं जो हृदयभेदक विलाप केला आहे त्याचें वर्णन कोठवर करावें ? " धांव धांव कृष्णा दावीरे वदना । पाजूं आतां पान्हा कोणालागीं ॥ तुझिया कौतुकें कंठीं मी संसार । जळतें अंतर तुजसाठीं ॥ नामा म्हणे शोकें जाऊं पाहे प्राण । रुकळांचें

जीवन कृष्णनाथ. " नंदाची स्थिति तरी किती शोकाकुल झाली पहा—" चिंतेनें व्याकुळ पिटी वक्षस्थळा । दावारे सांवळा प्राण माझा ॥...समस्तांची दृष्टी करी तुज कष्टी । म्हणोनी जगजेठी टाकियेले ॥ गोकुळींचे जन देऊं पाहे प्राण । वांचाया कारण काय आतां ? " सर्व गोकुळाच्या जीवींचा जिव्हाळा अशा संकटांत असतां स्थिरचर सृष्टी याप्रमाणें शोकानें भरून गेली. सर्वजण धांवत येऊन त्या डोहाचे कांठीं उभे राहिले. आपल्यामुळें हें प्रभूवर संकट कोसळलें असें वाटून बिचारा वाकड्या तर ढसढसा रडायला लागला ! गोकुळांतील सर्व लोकच काय पण गाईवांसरांची व सचेतन अचेतन सृष्टीची स्थितीसुद्धां हवालदील होऊन गेली व प्रभूच्या सुखरूप आगमनाची प्रत्येकजण सोत्कंठ हृदयानें वाट पाहूं लागला. गोकुळाच्या त्या कलिजाला—त्या पंची प्याऱ्याला सुखी ठेवण्यासाटीं सर्वजण त्या जगच्चालकाची प्रार्थना करूं लागले !

इकडे श्रीकृष्ण धाड्कन त्या डोहांत उडी मारून खालीं खालीं पोहत चालले. त्यांना त्या कालियाचा अत्यंत राग आला होता व त्या सपाट्यांत ते त्यास ठारच करणार होते. पण कालियाच्या दोन बायका—सर्पिणी प्रथम प्रभूस सामोऱ्या आल्या! " कुठाय तो कालिया ?" देव खवळून म्हणाले " त्यास एक लाथ मारीन तर तुझांस विधवाच करून टाकीन !" "देवा !" त्या सर्पिणी संतप्त प्रभूची स्तुती करून म्हणतात " कर्तुमकर्तुं असें आपलें सामर्थ्य आहे! पण त्याचबरोबर आपण दीनवत्सल आहांत व शरणागतास अभयदान देणें हें तर आपलें ब्रीद— हा " ब्रीदाचा तोडर "—चराचरांत गाजत आहे. देवा ! आम्हीं तुम्हांला शरण आहों " आम्हांलागीं आतां देई चुडेदान । "—आमचें सौभाग्य कायम ठेवा एवढेंच आमचें तुमच्याजवळ मागणें आहे " असें म्हणून " धरिती चरण कृष्णजीचे. " त्या वेळीं दयाघन प्रभूचें हृदय द्रवलें ! त्यांची ती केविलवाणी प्रार्थना ऐकून त्या 'शरणागतभयशमनास' करुणा आली व त्यांनीं " कालियास ठार करीत नाहीं " असें त्यांस अभयदान दिलें !

प्रभू तसेच झपाट्यानें पोहत खालीं निघाले व डोहांत तळाशीं निजलेल्या त्या अजस्र सर्पाच्या धुडास त्यांनीं एक सणसणीत लत्ताप्रहार केला ! त्याबरोबर दचकून तो सर्प वर पाहूं लागला तों एक चौदा पंधरा वर्षाचें झगझगीत पोर ! पोर खरें पण तें थोराहूनही थोर होतें हें त्या कालियास काय ठाऊक ? त्यानें आपल्या विषाचे लोळच्या लोळ त्या बालकाच्या अंगावर फेकण्यास सुरवात केली. पण त्याचा कांहींच परिणाम होत नाहीं असें पाहून मग आपल्या अजस्र-

शरीराच्या पकडींत त्यास चेंचून मारावा म्हणून तो दुष्ट कालिया आपल्या शेपटीचे वळसे श्रीकृष्णाच्या देहाभोंवतीं घालूं लागला ! प्रभूंनीं शांतपणें त्याला वळसे घालूं दिले व नंतर त्याचें डोकें व शेपटीचें टोंक आपल्या वज्रपंजर अशा दोन हातांत पकडून त्यांनीं आपलें अंग फुगविण्यास सुरवात केली. त्याबरोबर तटातट त्या शेपटीचे वळसे तुटून ढिले होऊं लागले. कालिया आपल्याकडून ते आवळण्याचा यत्न करी पण पुन्हां देवांनीं आपलें शरीर पहिल्याहून अधिक फुगविलें कीं कचूदिशीं कालियाचा फांस ढिला होई ! शेवटीं कालिया रक्तबंबाळ झाला. जागोजाग त्याचें शरीर फाटून त्यांतून रक्त वाहूं लागलें. " शरीरीं फांसोळ्या बहु खुळखुळ्या होउनि ढिल्या गती तत्प्राणांच्या सकळहि गळ्यामाजि शिरल्या " अशी स्थिति झाल्यावर त्यानें आपले कृष्णाभोंवतींचे वेढे काढले व " चुळचुळे निसटे वरच्यावरी " अशी त्याची पुन्हां धडपड सुरू झाली; पण श्रीकृष्णांनीं त्याला जास्त मस्ती करायला अवसर न देतां ताबडतोब त्याच्या पांच फडांच्या नाकांत वेसण घातली व त्यावर आरोहण करून उजव्या हातानें त्याची वेसण व डाव्या हातानें त्याचें शेंपूट धरून त्यावर त्यांनीं नाचायला सुरवात केली. शंकरादिकांचेहि नाट्यगुरु श्रीकृष्ण भगवान् एखाद्या नटासारखे त्याच्या पाठीवर नाचूं लागले. " अंतर्यामीं जाणे जन झाले वेडे । नामा म्हणे वेढे काढीतसे " आणि मग " तयाचे मस्तकीं नाचे नारायण । आरंभी गायन जगदीश. " लवकरच चेंचून चेंचून त्यांनीं त्याला बेदम केला तेव्हां तो प्रभूला शरण आला ! हें पोर सामान्य नव्हे, साक्षात् परमात्म्याची सगुण मूर्ति आपल्या पाठीवर-मस्तकांवर-नाचत आहे हें त्यास उमगलें व तो प्रभूला शरण गेला ! प्रभूंनींहि मग त्याला अधिक न चेंचतां त्यास जीवदान दिलें व त्यासह पोहत पोहत ते वर आले. जलाच्या पृष्ठभागावर जेव्हां त्या नटाची ती नाट्यलीला दृष्टीस पडली-कालियाच्या पाठीवर आरोहण करून कोमल नृत्य करणारी प्रभूची ती श्यामसुंदर मूर्ति जेव्हां सर्व व्रजांनीं पाहिली--तेव्हां त्यास पहावयास अधीर झालेल्या सर्वत्रांस किती आनंद झाला असेल-आपला जीव आपणास परत मिळाला म्हणून त्यांनीं केवढा जयघोष केला असेल याची कल्पना वाचकांनींच करावी ! " त्या वेळेस आकाशांतून देवांनीं श्रीकृष्णावर पुष्पवृष्टि केली. नदीकांठचे वृक्षांनींही आपलीं पुष्पें त्यावर ढाळून त्याचें स्वागत केलें ! " डोहाच्या पृष्ठभागावर आल्यावर प्रभूंनी त्या कालियास एक थप्पड मारिली व " जा ! आत्तांच्या आत्तां या डोहांतून निघून जा. आणि याद राखून रहा. पुन्हा जर इथें येशील तर ठारच होशील हें खूप समज. "

अशी त्यास जरब देऊन, तसेच " ज्या गरुडाच्या भीतीनें तूं इथें येऊन राहिलास तो ' तुझिया मस्तकीं असती माझे चरण ' म्हणून तोही तुला आतां खाणार नाहीं तूं कांहीं काळजी करूं नकोस " असें त्यास आश्वासन देऊन व त्याच्या नाकांतली वेसण काढून घेऊन त्यांनीं त्यास तेथून काढून लावला ! व आपण नदीकांठीं उडी घेतली ! तेव्हां सर्वांनीं आनंदानें त्यांना कडकडून मिठ्या मारल्या; नंद-यशोदेनीं त्याला जवळ घेऊन त्याचें मस्तक अवघ्राण केलें; म्हाताऱ्या बायांनीं त्यावरून लिंबलोण उतरलें; व लहान थोर सर्व गोपगोपींच्या व गाईवासरांच्या नेत्रांतून आनंदाश्रू वाहूं लागले ! " गाई धांवताती । कृष्ण–अंगातें चाटिती ॥ " यापेक्षां त्या आनंदाच्या प्रसंगाचें आम्ही जास्त काय वर्णन करणार ? कारण :" न वर्णवे तो आनंद । नामयाची बुद्धि मंद. "

यानंतर रानगाढवांच्या कळपांत गर्दभाचे रूपानें फिरणाऱ्या धेनुकासुरास व त्याच्या हस्तकास रामकृष्णांनीं ठार मारून रानांतला तो भाग त्यांनीं निर्भय केला. तसेंच ' प्रलंब ' राक्षस ' रामा 'स पाठीवर घेऊन पळून जात असतां रामांनीं त्यास असा एक सणसणीत मुष्टिमोदक चारला कीं त्याबरोबर तो राक्षस तत्काळ गतप्राण होऊन पडला. तेव्हांपासून आमच्या रामास ' बलराम ' हें नांव प्राप्त झालें.

तसेंच एकदां वृंदावनांतील जंगलांत–अरण्यांत उन्हाळ्याच्या दिवसांच्या भयंकर उष्णतेमुळें एकदां भयंकर वणवा लागला व त्यांत गाईवांसरासुद्धां सर्व सवंगडी जळून भस्म होतात कीं काय अशी स्थिति येऊन पोंचली. तेव्हां सर्व सवंगड्यांनीं श्रीकृष्णाची–त्या दीनदुनियेच्या जादुगाराची–प्रार्थना केली कीं " कृष्णा ! यांतून वांचवणारा आतां तूंच काय तो समर्थ आहेस ! " तेव्हां कृष्णांनीं त्यांना डोळे मिटून घेण्यास सांगितलें व आपलें विराट रूप धारण करून तो सर्व दावाग्नि पिऊन टाकला ! काय हा प्रताप !

हळुंहळूं पावसाळा सपून शरदृतु सुरू झाला. पांढऱ्याकाळ्या फुलांची बहार, केवड्याचा घमघमाट, हंससारसांचे थव्यांची यमुनातीरावरील शोभा, तीं पिवळीं धमक कणसें व ते जलहीन शुभ्र मेघखंडांचें इतस्ततः आकाशोद्यानांतील भ्रमण यांची अलौकिक शोभा वृंदावनांत कांहीं काळ भरून राहिल्यावर लवकरच कांहीं दिवसांनीं शरदृतूच्या प्रारंभींच नित्याप्रमाणें पाणी देणाऱ्या ' मेघराजा ' ची आराधना करण्यासाठीं त्या व्रजांतील गवळ्यांनीं शक्रोत्सवाची तयारी केली. पण " ज्याची जी वृत्ति असेल त्यानें त्याचें पूजन करावें. तेव्हां आपण गाईचें व प्रथम त्यास आधार-

भूत अशा गोवर्धनाचें–आपल्यावरील तृणादिकांनीं गाईचें वर्धन–वाढ करणाऱ्या ह्या सुंदर पर्वताचें–पूजन करूं या " असें सांगून श्रीकृष्णांनीं त्याच दह्यादुधाच्या साहित्यांनीं त्यांच्याकडून ब्राह्मणांस बोलावून मोठ्या थाटांत गिरियज्ञ केला व करविला व गाईचें पूजन करून त्यांस नानाप्रकारें शृंगारून त्यांनीं त्या गोवर्धनास अनन्यभावें प्रदक्षिणा घातली.

हें पाहून त्या " मेघराजास "–इंद्रास सपाटून राग आला व हत्तीसारख्या दाट व काळ्या कुळकुळीत मेघांची आकाशांत एकच गर्दी उडवून हत्तीच्या सोंडेसारखी त्यांनीं जी मुसळधार पावसाची वृष्टि सुरू केली त्यानें सर्व मनुष्य, पशुपक्षी गांगरून गेले व प्रलयकाळ जवळ आला कीं काय असा भास होऊं लागला. दोन दिवस पावसाचा असा बेदम मार खाल्ल्यावर सर्व जीव मेटाकुटीस आले, आकाशांत सूर्यचंद्र आहेत कीं नाहींत याचा पत्ता लागेना; तेव्हां ह्या इंद्राच्या कोपापासून " कृष्णा ! आतां तूंच आमचें रक्षण कर ! " म्हणून सर्वांनीं त्यास हात जोडले. " घाबरूं नका " असें श्रीकृष्णांनीं त्यांस अभय दिलें. व थंडीनें काकडून गेलेल्या व जलमय झालेल्या गोकुळाचें रक्षण करण्यासाठीं जवळच असलेला तो भव्य गोवर्धन पर्वत आपल्या एका करांगुलीवर उचलून धरला ! सात दिवस वृष्टि सारखी चालली होती; पण गोवर्धनाच्या व ' गोवर्धनधारी ' गोपालकृष्णाच्या संरक्षणाखालीं सर्व गोकुळ सुरक्षितपणें आपले व्यवसाय करीत होतें. काय हें अद्भुत सामर्थ्य ! याच सामर्थ्याच्या जोरावर श्रीकृष्णास " उपेंद्र " ही पदवी प्राप्त झाली आहे. असो. पण वाचक ! अशाच ' निरभ्र शारदी रात्रीं सम्राटाच्या श्वेत छत्राप्रमाणें ' आकाशोद्यानांत चंद्रमा स्वेच्छ विरहत–झुलत–डोलत असतां श्रीकृष्णांनीं केलेल्या रासक्रीडेचें वर्णन वाचण्यास तुम्ही फार उत्सुक झालां असाल नाहीं ? चला तर आपण आतां तिकडेच वळूं.



# भाग तिसरा.



आम्हांस आतां एका अत्यंत महत्त्वाच्या- कृष्णचरित्रांतील अत्यंत रम्य अशा भागाचें म्हणजे श्रीकृष्णाच्या सौंदर्यानें, मुरलीनें, व प्रेमानें सर्व गोकुळास- विशेषेंकरून सर्व गोपींस- कसें वेड लावून सोडलें होतें त्याचें वर्णन करावयाचें आहे. पण विसाव्या शतकांतील आमची काव्यदृष्टि इतकी हरपली आहे, अत्यंत उच्च व रमणीय अशा परमेश्वरी प्रेमकल्पनेस आह्मी इतके पारखे झालों आहों, व पारमार्थिक ज्ञानाचा सांठाहि आमचा इतका क्षीण झाला आहे कीं, याच प्रेमाच्या दिव्य मोहनाचें संगीत आम्हांस ऐकूं येईनासें झालें आहे- त्याऐवजीं आम्हांस बदसूर ऐकूं येऊं लागले आहेत, त्या सौंदर्यविलासाचें- प्रेमतन्मयतेचें तें रमणीय चित्र आमच्या काव्यमय चक्षूंस न दिसतां त्या जागीं आम्हांस व्यभिचाराचें हिडिस चित्र दिसूं लागलें आहे; तेव्हां त्याचें प्रथम निराकरण करून मगच आपल्या रम्य विषयांत शिरावें हें बरें.

वरील तऱ्हेनें आमची दृष्टि आकुंचित व विकृत झाल्यामुळेंच आम्हांस एका कृष्णाचे ऐवजीं दोन कृष्ण-- रासक्रीडा करणारा एक व गीता उपदेशिणारा दुसरा- असे वेगळाले कृष्ण दिसूं लागलेआहेत. पण त्या गीता उपदेशकानेंच " सर्व धर्मान् परित्यज्य मामेकं शरणं व्रज " मग त्यांत कितीही " पापें " झालीं तरी " अहं त्वा सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः " अशा तऱ्हेचा उपदेश केला आहे हें ह्या आपल्याच डोळ्यांत बोट घालून " एकाचीं तीं दोन " करणाऱ्या गृहस्थास ठाऊक नाहीं काय ? परमेश्वरप्राप्तीच्या मार्गांत अधर्माचें आचरण झालें तरी क्षम्य आहे, नव्हे धर्म्य आहे, हें पारमार्थिक तत्त्व यांना ठाऊक नाहींसें दिसतें. कायद्याचा भंग करण्यानेंच कधीं कधीं खऱ्या कायद्यांचें योग्य परिपालन होत असतें हें अमेरिकन तत्त्ववेत्त्या थोरोचें वचन- ह्या गृहस्थांनीं नीट लक्षांत घ्यावें. कारण सर्व धर्माधर्मांचें परिपालन तरी कशासाठीं करायचें ? एका परमेश्वरप्राप्तीसाठीच ना ? मग तोच परमेश्वर जर प्राप्त होत आहे तर प्रसंगीं सर्व लौकिक धर्मांवर लाथ मारली, त्यांचा त्याग केला, नव्हे लौकिकी भाषेंत बोलावयाचें तर अधर्माचा अवलंब केला तर त्यांत कोठें चुकलें ? यासाठीं कृष्णाच्या अद्वैतत्वाची गोडी त्यास

एकाचे ठिकाणीं दोन कल्पून यांनीं कमी करूं नये. कारण त्यानें किती रसहानि होते याची त्यांना कल्पनाही नाहीं असें दिसतें. पण इतकी सगळी यातायात करावयाची कशासाठीं किंवा काय म्हणून ? तर कृष्णगोपींच्या व्यवहारांत व्यभिचार झाला म्हणूनच ना ? पण त्या व्यवहाराकडे ज्या काव्यमय, उच्च व रसिक दृष्टीनें पहावयास पाहिजे त्या दृष्टीनें तें पाहिलें गेलें नाहीं म्हणूनच हा घोटाळा माजला आहे. या कामीं बुद्धीची भयंकर दिशाभूल झालेली आहे–किंबहुना येथें बुद्धीचें काम नसून हृदयाचें–सहृदयत्वाचें काम आहे. त्या हृदयाच्या उच्च भरारींत रासक्रीडेसारख्या प्रसंगाचें बहारदार वर्णन चालू असतां त्याच उंचीवर आरोहण करून एखाद्या चंडोलाप्रमाणें त्याशीं समरस होण्याची अंगांत ताकद नसल्यामुळें खुद्द परीक्षितीची या कामीं दिशाभूल होऊन "खुद्द भगवान् असें जिगुप्सित कर्म कसे करते झाले ?" असा अरसिक प्रश्न त्यानें शुकाचार्यांस केला आहे व त्यांनीं ज्या व्यावहारिक दृष्टया प्रश्न केला त्याच दृष्टीनें "तेजीयसां न दोषाय वन्हेः सर्वभुजो यथा" असें उत्तर देऊन शुकांनीं त्याचें समाधान करून ते पुढें चालले आहेत. वास्तविक वरील परीक्षितीचा प्रश्न व शुकांचें उत्तर हीं दोन्हीहि मागाहून कुणी तरी मुळांत दडपलीं असण्याचाही संभव आहे. कारण अशा तऱ्हेनें जुनीं पुस्तकें-जुने ग्रंथ–हाताळण्याची तऱ्हा आपण महाभारतांत पाहिलीच आहे. पण तें कांहीं असलें तरी या कामीं भयंकर दिशाभूल झालेली आहे ही गोष्ट खास. व ज्यांच्या कल्पनेची भरारी तितकी उंच जाऊन पोंचत नाहीं, रसिकता, काव्यमयता, सहृदयत्व, आध्यात्मिक उच्चता, इत्यादि गोष्टींत जे जमिनीवरूनच सरपटत आहेत अशाच बहुतेकांनीं हा विपर्यास केला आहे. त्या कामीं बाह्य देखावा तसाच भूल पाडणारा–चकवणारा असेल; पण अशा देखाव्यांतूनच–अशा 'मायेच्या बाजारांतूनच'–'अंतरंगांत' बुडी मारावी लागत असते ! तशी न मारतां वरच्याच गोष्टीला फसून जाऊन वरील परीक्षितीसारखी समजूत करून घेणें हें चूक होणार आहे—रंगभूमीवर स्त्रीपार्टांत सजून आलेल्या एखाद्या पुरुषास स्त्री समजून तिला कवटाळण्यास धांवण्यासारखें आहे– रा. पांगारकरांच्या भाषेंत बोलावयाचें तर "सापसाप म्हणून भुई धोपटण्या" सारखें आहे ! पण कृष्णगोपींच्या रासक्रीडेस रूपक म्हणणारांची जशी ती स्थिति आहे त्याचप्रमाणें कृष्णांनीं गोपींशीं व्यभिचार केला असें समजणारांचीही तीच व त्याहूनही अक्षम्य चूक आहे. प्रत्यक्ष भगवंतांच्या बाबतींत अशा प्रकारची कल्पना करणारांची खरोखर धन्य आहे, यावांचून दुसरें काय म्हणायचें ?

पण खुद्द भगवान् असें कर्म कसें करतील यांचा जुन्यानव्या लेखकांपैकीं फारच थोड्यांनीं विचार केलेला दिसतो. तसेंच आम्हांस हेंहीं सांगितलें पाहिजे कीं, जर श्रीकृष्णाच्या व्यभिचाराची गोष्ट निव्वळ काल्पनिक व भ्रामक नसेल–पण ती काल्पनिक व शुद्ध भ्रामक आहे अशीच आमची ठाम समजूत–नव्हे खात्री आहे-- व वरील परीक्षितीचा प्रश्न व शुकांचें उत्तर हें जर खरें असेल म्हणजेच कृष्णाचें जुगुप्सितकर्म जर खरें असेल तर मात्र त्यावरील शुकांच्या उत्तरानें परीक्षितीचें व त्याजबरोबर इतरांचेंहि कोणाचें समाधान झालें असेल तें असो पण आमचें मात्र त्यानें समाधान होत नाहीं हें आम्हीं स्पष्ट कबूल करतों; किंबहुना अशी असमाधानाची स्थिति ह्या कृष्णावरील आळासंबंधी आमची कित्येक दिवस--कित्येक महिने-कदाचित् कित्येक वर्षें असतांनाच आम्हांस एका सुप्रभातीं हें कोडें त्याच दयामय व प्रेमळ प्रभूच्या रुपेनें सुटलें-उलगडलें व आम्हीं तें तत्काळ पद्यांत लिहूनही काढून आमच्या मित्रांस दाखविलें व त्यांलाहि तें वाचून आनंद झाला. अस्तु. हा आमचा उलगडा आम्हीं पुढें दिलाच आहे; पण त्याचा थोडक्यांत निष्कर्ष हाच कीं गोपिकांच्या मनानें श्रीकृष्ण पति वरिले होते. अत्यंत शुद्ध नैतिक दृष्टीनें पाहतां अशा तऱ्हेचा मानसिक ‘ व्यभिचार ’ हा सुद्धां “ शास्त्रप्रवृत्तिविरुद्ध ” च आहे ही गोष्ट खरी; किंबहुना गोपींच्या ठिकाणीं “ कामासक्ती ” चें वारें प्रथम होतें हेंही खरें. पण गोपींच्याकडूनसुद्धां शारीरिक व्यभिचारासाठीं धडपड झाली किंवा नाहीं याची सुद्धां थोडीशी शंकाच आहे; तथापि झाली असें जरी धरलें तरी प्रभूंनीं त्यांच्या त्या ‘ दुरासद कामरूप शत्रूस ’ कांहीं निराळ्याच प्रकारें ठार मारलें आहे. विठ्ठलाचा नामधारक भक्त नामदेव ह्याची प्रथमची सगुण भक्ति इतकी दांडगी असूनही तें “ कच्चें मडकें ” कसें होतें हें आपणास ठाऊकच आहे. त्याच न्यायानें गोपींना जो प्रथम ‘ काम–ज्वर ’ बाधला त्याचें कारण ‘ अद्वैताज्ञान ’ हेंच होय–विश्वव्यापक परमात्म्याची उच्चभक्ति त्यांच्या ठिकाणीं बाणायची होती; व ती रासक्रीडेसारख्या प्रसंगीं ईश्वरांनीं बाणवून त्या उच्चसुखांत त्या गोपींस प्रभूंनीं कसें नेऊन सोडलें हें आम्हीं पुढें सविस्तर वर्णिलेंच आहे. पण ह्या मानसिक व्यभिचाराचे बाबतींत मात्र आम्हांस एवढेंच म्हणायचें आहे कीं, एवढी अनीति, एवढा अधर्म कोणाही स्त्रीनें वाटल्यास करावा अशी त्या कामीं साधुसंतांची व खुद्द ईश्वराचीही त्याला मुभा आहे. “ देव जोडे तरी करावा अधर्म ” ह्या तुकोबांच्या अभंगाचें सार तरी हेंच आहे. प्रत्यक्ष शारीरिक व्यभिचार परमेश्वर केव्हांही करणें शक्यच नाहीं–किंबहुना

तसा तो करील तर तो परमेश्वरच नव्हे; तर ' पौंड्रकवासुदेवा ' सारखा ' तोतया ' परमेश्वर म्हणून बेशक समजावा ! पण आमचा भगवान् गोपालकृष्ण तसा नव्हता. तो खरोखरच ईश्वरावतार होता—स्वातंत्र्याची, प्रेमाची, सौंदर्याची, आकर्षकतेची ती चिन्मय मूर्ति होती हें दांभिकांनीं, नास्तिकांनीं, कुतर्कवाद्यांनीं व त्याच्या मायेनें भ्रमलेल्या जीवांनीं लक्षांत ठेवावें ! तो प्रभु प्रेमळ होता, सहृदय होता व त्याला कामविकारानें कां होईना पण गोपींच्या मनाची व देहाची होणारी तळमळ पूर्ण ठाऊक होती. पण एकाच स्पर्शाबरोबर एखाद्या जादूच्या कांडीप्रमाणें त्यांनीं ती सर्व सृष्टि बदलून टाकली. मानसिक ध्यानाच्या बाबतींत " पाहे पां वालभाचेनि व्याजें । तया वज्रांगनांचीं निजें । मज मीनालिया काय माझें । स्वरूप नव्हतीं ? " व " तैसा गोपिकांसि कामें " इ. ओव्यांतून ज्ञानोबासारखे संत तीच गोष्ट सांगतात. परमेश्वराचें खरें स्वरूप न कळलें—त्याची खरी ओळख न झाली तरी देखील सोयरा, मुलगा, मित्र, नवरा, शत्रु वाटेल त्या नात्यानें जरी त्या प्रेममयाचा उत्कट ध्यास घेतला—परमेश्वराचा प्रत्यक्ष द्रोह व शत्रुत्व केलें तरी सुद्धां तें तो ' उदरांचा राणा ' विरोधी प्रेमच मानतो-तरी शेवटीं मोक्षप्राप्ति ही ठेवलेलीच आहे. अजामिळासारखा पापी पण " पुत्रभावें स्मरण केलें । तया वैकुंठासी नेलें " हें आपणास ठाऊकच आहे. यासाठींच " तेंचि भलतेणें भावें । मन मज आंतु येतें होआवें । आलें तरी आघवें । मागील वावो " असें ज्ञानोबा म्हणतात तें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. गटाराचें जरी पाणी असलें तरी गंगेंत जाऊन पडल्यावर " मग होऊनि ठाकती केवळ । गंगारूप. " बाभळीचें लांकूड व चंदनाचें लांकूड हा भेद कोठवर ? जोंवर तीं लांकडें अग्नीच्या बाहेर आहेत तोंवर—" जंव न घापती एकवटें । अग्नीमाजीं "— पण मग दोहींचा अग्नि एकच ! मुख्य प्रश्न जो आहे तो स्वतःचीं " निजें "—म्हणजे अंतःकरणें—प्रभूच्या ठायीं रंगण्याचा, उत्कट प्रेमाचा आहे ! व गोपिकांचें प्रेम श्रीकृष्णावर किती उत्कट होतें याचा विचार आम्ही लवकरच करणार आहोंत. पण तत्पूर्वी प्रत्यक्ष व्याभिचाराचें आचरण, दैहिक-शारीरिक व्यभिचाराची क्रिया, प्रत्यक्ष संभोगव्यभिचार कृष्णाच्या हातून झाला काय याचा अजून थोडासा विचार करूं या.

दैहिक व्यभिचार श्रीकृष्णानीं त्यांच्याशीं केला हें म्हणणें केवळ चूक आहे. कारण सर्व जगाला आपल्या वर्तनाचा धडा घालून देण्यास अवतरलेले देव व " ममवर्त्मानुवर्तंते मनुष्याः पार्थ सर्वशः " असें सांगणारे भगवान् स्वतःच व्यभिचार करतील ही

गोष्ट युक्तिजुक्तीस जुळत नाहीं. " मुखीं राम त्या काम बाधूं शकेना " इतका केवळ ज्याच्या नांवाचा प्रताप तो परमात्माच खुद्द त्या गोपींसन्निध असतां त्यांस कामव्यथा व्हावी हें विपरीत दिसतें. यासाठींच " म्यां गोपिकांसीं काम केला । कीं त्यांचा सकळ काम हरिला " असें नाथ विचारतात. " एथ कामाचें न चले बाण। दृढ वोरण स्मरणाचें " असें रासक्रीडावर्णनप्रसंगीं नाथ म्हणतात, त्यावरूनही दैहिक पशुवृत्तीच्या कामाचें उत्थापन व शमन हें येथें दिसत नाहीं. निदान तें श्रीकृष्णाच्या बाजूनें तर शक्यच नव्हतें. कारण " नानवाप्तमवाप्तव्यं " अशा प्रकारचा तो आप्तकाम प्रभू. मानवी गुणधर्मांनीं तो वेष्टित झाला, मायेचा पगडा त्यावर बसला, त्रिगुणांच्या झोल्यावर तो झोके खाऊं लागला, तर मग तो प्रभु कशाचा ? गोपिकांच्या मनांत जरी तसल्या पशुवृत्तीचा उदय झाला असें घटकाभर धरलें तरी त्यांची शांति त्याला अन्य तऱ्हेनें करतां येत नव्हती काय ? प्रभुस्वरूप झालेले रामकृष्ण परमहंस विवेकानंदाच्या डोक्यावर नुसता हात ठेवतात तर त्याची दृष्टि फिरवून टाकतात– त्यास सर्वत्र ईश्वर दिसूं लागतो; मग इथें तर खुद्द परमात्मा होता. त्यास अन्य कोणच्याच उपायानें त्यांच्या कामाचें शमन करतां येणें शक्य नव्हतें काय ? अर्थात् तें पूर्ण शक्य होतें व अशाच एखाद्या उपायाचा अवलंब करून प्रभूंनीं " त्यांचा सकल काम हरिला " ही गोष्ट निःसंशय आहे. " गोपी चुंबिति, हुंगिति, आलिंगिति सुंदरा शरीरास " एवढयाच वर्णनानें हुरळून जाऊन त्या मंगलमय प्रभूवर व्यभिचाराचा अत्यंत निंद्य असा मिथ्यारोप करणारांनीं तत्पूर्वी " अस्खलितवीर्य भगवान् गोपींचा कामताप तो शमवी " ही ओळ जरूर लक्षांत घ्यावयास नको काय ? प्रियवाचक ! आपलें काव्यमय चक्षू--अध्यात्माच्या उच्च, मंगल, पवित्र वातावरणांत नेऊन सोडणारे दिव्य चक्षू-- क्षणैक उघडा व याच " कामहरणा "-चा आम्हीं केलेला खालील काव्यमय उलगडा असाच बहारीचा आहे तो सावधान चित्तानें " सर्वेंद्रियांस कान करून " ऐका:–

**चाल** ( चंद्रकांत राजाची कन्या० )

गोकुळांत देखुनी मनोहर रम्य कृष्ण मूर्ती ।
ध्यान लागलें ध्यास घेतला राधेच्या चित्तीं ॥
क्षणांत मोठा क्षणांत बाळक होतो पाहोनी ।
मधुर अशा अव्याज तयाच्या कामचेष्टितांनीं ॥

मोहक मुरली जगत्त्रयाला वेड लावणारी ।
विद्ध करी राधेच्या चित्ता काम-शरा मारी ॥
सुनील तनुची देखुनि उज्ज्वल दिव्य अंगकांती ।
पंचबाणव्याकूळ होउनी मानितसे खंती ॥
मत्स्याकृति कुंडलें झळकती देखुनिया कर्णी ।
वैजयंति तळपते हरीच्या कंठिं हेमवर्णी ॥
हेवा वाटे वैजयंतिचा राधेच्या चित्तीं ।
मनीं म्हणे " ह्या भाग्याची मज होइल कां प्राप्ती ? ॥
वैजयंति मालिके, सदा कां तूंच गळां पडशी ? ।
भाग्यवंत तूं खरी एकली जगत्त्रयीं असशी ! ॥
अभागिनीला मला कधिं असा येइल कां समय ? ।
वैजयंति सांग गे ! होतसें उत्कंठित हृदय ! " ॥



मधुर मुरलिचा रव ऐकुनिया इतुक्यांतचि आली-- ।
जागृतीस तंद्रींतुनि राधा, मग्न पुन्हा झाली ॥
" मुरलि, सांग गे कुठून ऐसें भाग्य तुला लाहे ? ।
मुरलि नाहिं कां माति मम कृष्णीं ? का न मला तें ये ? ॥
पार न मुरली ! जगीं खरोखर तुझिया सौख्याला ।
सांग तुझ्यासम कधीं योग्यता ये मम अधरांला ? ॥
हेवा वाटे देखुनि वैभव तुझिया भाग्याचें ।
सांग तुझ्यासम कधिं घेतिल मम चुंबन अधरांचें ? ॥
मिळवूनि ओठां मधुर ओष्ठ ते अपुले वनमाळी ।
पंचप्राणांतुनी काढिती सुस्वर कधिं काळीं ? ॥
सांग मुरलि, मम असेल कां गे ! भाग्य असें सखये ! ।
बोल किंगे ! कां बोलत नाहिंसि हृदय भरुनि कां ये ? " ॥
मुरलि बोलली " ऐक राधिके ! प्रेमानें अळवी– ।
वल्लभासि मम; तेणें येउनि सकल काम पुरवी ॥

कारण त्यांतें प्रेमळ गायन हरिणाहुनि भारी-- ।
अवडे ऐसें गूज मनींचें वदल दैत्यारी ! " ॥

* * * *

" सखया कृष्णा ! कां न येशि तूं अजुनि सांग मजला ? ।
चटका लावुनि मनीं आज कां मजवरती रुसला ? ॥
वेड लावुनी नारीहृदया अपुल्या लीलेनें ।
तळमळ त्याची करणें कां हें न्याय्य असें करणें ? ॥
' कंदुक लपले कंचुकिमाजी ' कोण असें बोले ? ।
धरुं जातां तुज कोण सांग तें पळूनिया गेलें ? ॥
' अंबरगत त्या पयोधरातें रगडुनि दूर पळे ।
कोण सांग राधिके ? ' प्रश्न हा; वदनीं स्मित खेळे ॥
मधुर बांसरी कृष्णकन्हैया वाजवुनी जाशी ।
घेउनि माझ्या पंचप्राणा संगें, सुखराशी ! ॥
असनीं, शयनीं, स्वप्नीं मजला ध्यान तुझें लागें ।
येउनि आलिंगुनी चहुभुजीं शांतवि मज वेगें ॥
काम न धंदा कांहीं सुचतो द्वारिं वाट बघतें ।
अजुनि दया कां ये न तुला मम ? अंजलि जोडीतें ॥
सांग कुणाला कामशरानें व्यथा न होई तें ? ।
तारुण्याच्या बहरीमध्यें रूप न मोहवितें ? ॥
कोण तुझ्यासम सुंदर जगतीं सांग सख्या कृष्णा ? ।
सदय हृदय तव अदय कसें हो; शांतवि मम तृष्णा ॥
तुला भाळली नाहीं ऐशी नारि नसे जगतीं ।
दोष कसा मग माझा ? जरि मी भाळे तुजवरती ॥
लज्जेची रक्तिमा तशी ती ओष्ठांची दावी ।
' रक्ता कीं मी तुजवरि सदया ! ' अंत न लव पाही ॥
धांव धांवरे ! धांव कन्हैया ! ताप न मज साहे ।
काम-ज्वर व्याकूळ करितसे काया ही पाहे " ॥

* * * * *

बोलुनि ऐशा बोला, निश्चल क्षणैक जों बसली ।
तंद्रि लागली राधेची तों धांवत वनमाळी-- ॥
तेथ पातला, मधुर करानें कुरवाळुनि वदना ।
" राधे ! राधे ! सत्वरि पाही या राधारमणा ! " ॥
वाणी उठली दिव्य अंबरीं ! राधाही उठली ।
सलज्ज धांवे; परस्परांची घट्ट मिठी पडली ॥
ओठांलागीं ओठ मिळाले, नयनां नयन जुळे ! ।
मदनमोहनें त्या श्रीकृष्णें तिजला शांतविलें ॥
परी खरें तें चुंबन नोहें दिव्य ज्ञानशब्द ।
एका ओष्ठा मधुनी दुसऱ्या ओती गोविंद ! ॥
नेत्रमिलन ? छे, मुळीं नव्हे तें; ज्ञानरवीकिरण ।
या नयनांतुनि दुज्या नयनिं ते घुसवी श्रीकृष्ण ! ॥
ज्ञानरवीच्या किरणें मेला हृदयिं कामव्याळ ।
कामाच्या लहरिंचें वाष्प वा करितो गोपाळ ! ॥
घट्टमिठीच्या मिषें हरीनें हरिलें अज्ञान ।
आलिंगनमिष वरी दाविलें अर्थ खरा भिन्न ! ॥
हृदयांची ती भेट जहाली सुंदर अनवद्या ।
निजहृदयींची तिच्या घातली हृदयिं ज्ञानविद्या ! ॥
विषयांसंगे धांवत होती बाह्य मनोदृष्टी ।
आंत खेंचली कृष्णकन्हैयें करण्या सुखवृष्टी ॥
" कसें वाटतें ? कांय दिसें तुज ? सांग मला राधे ! ।
' कामज्वर '-- यातना अजुनि कां तुजलागीं बाधे ? " ॥
" अष्टभाव प्रकटले जाहलें विश्व सकल कृष्ण ।
खालीं वरतीं बाह्य भीतरीं एक दिसे कृष्ण ! " ॥
ऐकुनि या राधेच्या बोला कृष्ण सखा वदला ।
" कवणें कवणा आलिंगावें ? सांग अतां मजला ? ॥

स्वयें स्वतांला आलिंगावें शक्य कसें आतां ।
त्रिपुटि लोप होउनी एकलें तत्त्व जगीं उरतां ? ॥
जलें जलां बुडवावें कैसें ? कैसें जाळावें-- ।
अग्नीनें अग्निला ? सांग मज कैसें हें व्हावें ? ॥
अशीच ठेवी अंतर्दृष्टी सौख्य सदा लागे ।
बहिर्वृत्तिच्या पाठिलागुनी नर जगतीं भागे ॥
हृदया असतां सर्व सुखाच्या आरामा वास ।
भ्रांतालागीं पहा ! लागला विषयीं हव्यास ! ॥
काम तिथें तो राम नसे गे ! राम तिथें काम ।
कामराम हे सहचर नसती तत्त्व असें ठाम ! ॥
राम पुरवितो काम मनींचे सकलहि, परि काम ।
राम भेटिचें काम करीना ! व्हावें निष्काम ! ॥
' राम मुखीं त्या काम न बाधे ' संतांची वाणी ।
जगीं न होइल फोल कधीं ती, सौख्याची खाणी ॥
तुला बाधला कारण होतें अद्वैताज्ञान ।
सांग परी जाहलें अतांना ' कामाचें हरण ? ॥ '



प्रियवाचक ! वरील रम्य उलगडा वाचून तुमचें खास समाधान झालें असेल असें आम्हांस वाटतें. जी राधेची स्थिति तीच सर्व गोपींची अवस्था; आणि अनंत रूपानें नटलेल्या त्या अनंतानें रासक्रीडेसारख्या प्रसंगीं सर्वांची कामशांति वरीलप्रमाणेंच करून दिव्य अद्वैतानंद लुटला आहे. कारण " त्रिविधं नरकस्येदं द्वारं नाशनमात्मनः " असा उपदेश करणाऱ्या भगवंतास त्या त्रिविध द्वारांपैकीं काम हें एक द्वार आहे हें पूर्ण ठाऊक होतें व तीं द्वारें बंद झाल्याशिवाय अधःपातापासूनचा बचाव होऊन गोपी वरच्या मार्गास लागणार नाहींत याची त्यांस पूर्ण जाणीव होती. मदनारि शंकर-कीं ज्या शंकरांनीं " क्रोधं प्रभो ! संहर संहर " अशा मरुद्गणांच्या प्रार्थनेस न जुमानतां आपल्या तृतीय नेत्राच्या प्रखराग्नीच्या ज्वालांचा स्रोत सोडून रागाच्या सपाट्यांत " भस्मावशेषं मदनं चकार " मदनास उभा जाळला--तो प्रत्यक्ष शंकरही ज्या प्रभूची "पायवणी"--पायापासून निघालेली गंगा " माथा वाहे "--मस्तकावर धारण

करतो व त्या प्रभूचें नांव अखंड स्मरतो तोच प्रभु त्याच मदनाच्या चेष्टा गोपींशीं खेळेल ही गोष्टच किती हास्यास्पद दिसते ? व ह्याच अर्थानें लावावयाचा असेल तर "मत्कामा रमणं जारं" इत्यादि श्लोक प्रक्षिप्त असावा असें वाटतें. कारण शुकाचार्यासारख्या अत्यंत श्रेष्ठ ब्रह्मचाऱ्यांनेंही ज्याची स्तुति गाइली, विसाव्या शतकांतले रामकृष्ण परमहंस, विवेकानंद, रामतीर्थ इत्यादि थोर महात्म्यांनीं सुद्धां ज्याचें गुणवर्णन केलें, व कबीरासारख्या शेंकडों भगवद्भक्तांनीं ज्या प्रेमाचे गोडवे गाइले त्या प्रेमांत--त्या दिव्य अलौकिक प्रेमांत-वैषयिक पशुवृत्तींचा चिखल कालवला असेल अशी कल्पनासुद्धां करण्यास मन धजावत नाहीं.

खरोखर या रासक्रीडेंत आम्हांस व्यभिचार दिसावा हें आमच्या विकृत दृष्टीचेंच दर्शक आहे ! कारण आम्ही या आक्षेपकांस असें विचारतों कीं, " पापविचाराच्या नुसत्या छायेनेंही दूषित झालेल्या हृदयाच्या सिंहासनावर तो विश्वसाम्राज्याचा प्रभु क्षणभरही विसांवणार नाहीं " हें आपणांस ठाऊक नाहीं काय ? " विषयबुद्धी तें मुख्य अज्ञान। तें असतां मी न भेटें जाण " असें श्रीहरि नाथमुखानें सांगत आहेत, तिकडे आपलें लक्ष नाहीं काय ? " त्या सुखप्राप्तीसाठीं योगाभ्यासी झालेला सदाशिव भिल्लीणीस भुलला व त्यामुळें त्या बापड्यास त्या दिव्य सुखाची प्राप्ती झाली नाहीं " असें श्रीहरि सांगतात, यांतील अर्थाचें मर्म आपल्या लक्षांत येतें काय ? येत असेल तर ज्या विषयसुखांत डुबल्यामुळें बिचारा हतभागी शंकर तें अलौकिक सुख प्राप्त करून घेऊं शकला नाहीं त्याच विषयसुखाची खैरात या रासक्रीडेंत झाली, अशा तऱ्हेचा अविचारी आरोप कृपाकरून आपण या रासक्रीडेवर करूं नका ! अहो टीकाकार ! जर या रासक्रीडेत त्याच विषयकर्दमाचा चिखल तुडवला गेला असता तर प्रत्यक्ष मदन आनंदानें नाचावयास लागला नसता काय ? पण तें रासक्रीडेचें सुख ह्या विषयसुखांहूनही उच्च, दिव्य, पवित्र व मंगल आहे हें पाहून बिचारा खिन्न झालाः " अरेरे ! ज्या सौख्याच्या जोरावर अनंग असूनही मीं त्रैलोक्याला झुलविलें व माझ्या चरणाचे दास बनविलें–शंकर, ब्रह्मा, इंद्र, चंद्र इत्यादि मोठमोठीं धेंडेंही ज्या मीं आपल्या अतुल शरसंधानानें लोळवलीं त्या मलाही ह्या सुखाची गोडी कळूं नये अं ? हाय ! भगवन् ! कन्हय्यालाल ! तें सुख–तें सुख आपण मला दाखवाल काय ? " अशा तऱ्हेचे विचार त्या ' अनंगा 'चे हृदयांत एकच गर्दी करूं लागले " हाय ! प्रभो ! तें सुख आपण मला दाखवाच. मी आपणास अनन्य शरण आहें ! " असें म्हणून जेव्हां त्यानें कृष्णा

प्रभूच्या पायांवर लोळण घेतली तेव्हां कुठें देवांनीं त्याला तो दिव्य आनंद चाखविला. अशा तऱ्हेच्या वर्णनाचा कांहींच अर्थ नाहीं काय ? टीकाकार, असें असूनही आपला अजून तोच आक्षेप असेल तर हा केवळ आपला " आग्रहोचि उरे " असें म्हणणें भाग आहे. विषयसुखांतच जर मौज असती तर त्या विषयसुखांत डुंबणारें सर्व जग शाश्वत व अव्यंग सुखासाठीं असें तळमळत कां राहतें ? जगांतील सर्व सुखाच्या राशीवर बसलेल्या मानवाचीही कोणच्या सुखासाठीं तळमळ चाललेली असते बरें ? तेंच तेंच सुख—तेंच अतींद्रिय, अज्ञात, शाश्वत, दिव्य मंगल पवित्र व ' पद्मादुर्लभ ' सुख ह्या प्रभूच्या दिव्य प्रेमांत विलसत होतें !

पण वैषयिक पशुवृत्तीस-- " दुरासद कामरूप शत्रूस " -- ठार मारणाऱ्या श्रीकृष्णांनीं गोपींना दुसऱ्याच प्रकारचें वेड लावलें होतें. आपल्या दिव्य रूपाच्या व अद्वितीय मुरलीच्या छंदानें त्यांनीं गोपींसच काय—पण गोकुळांतील सर्व चराचरसृष्टीस वेडें करून सोडलें होतें. नदीजलावरील तरंगभंगांतून व वायनें डोलणाऱ्या वृक्षपल्लवांतून " कृष्ण कृष्ण जय " हाच ध्वनि उमटत असलेला पुढें उद्धवास ऐकूं आला, याचें कारण हेंच श्रीकृष्णाचें अजब इंद्रजाल होय. श्रीकृष्णाच्या श्यामसुंदर मूर्तींकडे व अद्वितीय तेजानें झळकणाऱ्या मुखारविंदाकडे पाहतां पाहतां गोपी इतक्या तन्मय होत कीं त्यांना देहभानही रहात नसे. " ब्रह्मानंदीं लागली टाळी । कोण देहातें सांभाळी " अशी त्यांची अक्षरशः स्थिति होत असे. 'सायंकालीं श्रीकृष्णाच्या सुंदर वदनाकडे पाहण्याचा दिव्य आनंद लुटण्यासाठीं म्हणून मुद्दाम यशोदेच्या लामणदिव्यावर आपला दिवा लावण्यास आलेली एक गोपी त्या प्रभूच्या ध्यानांत इतकी रंगली कीं, इकडे तिचीं बोटें त्या दिव्यावर जळूं लागलीं तरी तिला त्याचा पत्ता नाहीं अशी रामतीर्थांनीं एक गोष्ट सांगितली आहे, त्यावरून हीच गोष्ट सिद्ध होते. श्रीकृष्णाकडे निघालेल्या ऋषिपत्न्यांना त्यांचे पती थांबवून-- अडवून धरूं लागले त्या वेळेस " ह्या देहाचे आपण पती आहांत, ह्या देहावर आपलें स्वामित्व आहे तर हा घ्या आपला देह " असें म्हणून देहत्याग करून कृष्णाकडे निघालेल्या ऋषिपत्न्यांची गोष्ट हेंच दाखविते. ( आणि खरोखरच खऱ्या अर्थानें सर्वांचाच " प्राणनाथ " तो एक परमेश्वरच नाहीं काय ? तेव्हां अशा त्या खऱ्या प्राणनाथाकडे त्या ऋषिपत्न्या निघाल्या हें साहजिकच आहे ). वल्लभाच्या नात्यानें म्हणा पाहिजे तर-पण गोपींना श्रीकृष्णाचें ध्यान, श्रीकृष्णाचें मनन, व श्रीकृष्णाचेंच चिंतन सदैव असे. " मनें हरिरूपीं गुंतल्या वासना । उदास या सुना गौळीयांच्या "

असें तुकोबानीं त्यांचें कौतुक केलें आहे. " राम म्हणे करितां धंदा । सुखसमाधी त्या सदा " ह्या तुकोक्तीप्रमाणें श्रीकृष्णाच्या चिंतनाच्या सुखसमाधींत डुलणाऱ्या त्या ' विदेही ' गोपी होत्या ! " देह तरी वरिचिलीकडे । आपुलिया परी हिंडे । परी बैसका न मोडे । मानसींची " या ज्ञानोक्तीप्रमाणें सर्व कामधाम करतानांसुद्धां त्यांच्या हृदयांत अखंड श्रीकृष्णध्यानाची बैठक विराजमान असे. " भ्रमण चक्रीं न भवे । ध्रुवु जैसा " ह्या ज्ञानेश्वरप्रतिपादित न्यायानें व्यवहारांतल्या व गृहकृत्यांतल्या सर्व कामांत एखाद्या भोंवऱ्याप्रमाणें जरी त्यांचा देह फिरत असला तरी त्या भोंवऱ्यांतल्या मध्यबिंदूप्रमाणें त्यांच्या हृद्यांतली श्रीकृष्णचिंतनाची समाधी सदा स्थिरच असे. अर्थात् अशा तऱ्हेच्या गोपींच्या दृढ चिंतनाचा-- श्रीकृष्णछंदाचा-परिणाम " मन रामीं रंगलें अवघें मनचि राम झालें " असा झाला-- " व्रजांगनांचीं निजें " श्रीकृष्णस्वरूप झालीं-- ह्यांत काय आश्चर्य ? " बालभाचेनि व्याजें "-च ही गोष्ट झाली हें खरें. व मनश्चिंतनाच्या दृष्टीनें त्यांच्या हातून मानसिक व्यभिचार झाला असें फार तर केवळ ऐहिकांतच बुडलेले क्षुद्रजीव म्हणोत; पण अशा तऱ्हेच्या मानसिक " व्यभिचारा " नेंच शेवटीं गोपी मुक्तिपद पावल्या– " अव्यभिचारिणी " भक्तीच्या पराकोटीस जाऊन पोहोंचल्या– ही गोष्ट निःसंशय आहे. व अशा तऱ्हेचा मानसिक व्यभिचार हा कितीही लौकिकास, शास्त्रप्रवृत्तीस, विधिविधानास, धर्मास विरुद्ध असला तरी तो खुशाल करावा–त्यानें जर देव जोडत आहे तर खुशाल करावा हेंच तुकोबांचें सांगणें आहे. ' देवाच्या सख्यत्वासाठीं ' वाटेल त्या धर्मावर लाथ मारली तरी त्या " पापा " पासून तोच प्रभु सर्वांस मुक्त करतो अशी त्याची जाहीर ग्वाही आहे–आणि हीच परमार्थाची नीति आहे हें आम्हीं वर सांगितलेंच आहे. श्रीकृष्णाचा छंद लागावा–त्यांनीं मन वेडें व्हावें हेंच ध्येय आहे; कारण त्यानेंच त्या ध्यात्याची काया सुद्धां श्रीकृष्णस्वरूप बनते असा निसर्गाचा रोकडा सिद्धांत आहे. मग तें वेड, तो छंद, तो ध्यास, ती तळमळ, तें उत्कट चिंतन, वाटेल त्या मार्गानें लागो–त्याला " उपायांची नाहीं । वाणी एथ " असें तो सदय व सहृदय परमात्मा ' बाहे ' उभारून सांगत आहे. किती तऱ्हेनें हें कार्य करतां येतें त्याची यादीच ज्ञानोबा देतात ती ऐका, म्हणजे वाचक ! ह्या उपायवैविध्याची आपणांस पुरी ओळख पटेलः—

" पाहे पां बालभाचेनि व्याजें । तिया व्रजांगनांचीं निजें । मज मीनलीया काय माझें । स्वरूप नव्हतीं ? ॥ नातरी भयाचेनि मिसें । मातें न पविजेचि काय कंसें ? । कीं

अखंड वैरवशें । चेद्यादिकीं ॥ अगा सोयरेपणेंचि पांडवा । माझें सायुज्य यादवां । कीं ममत्वें वसुदेवा- । दिकां सकळां ॥ नारदा ध्रुवा अक्रूरा । शुका हन सनत्कुमारा । इयां भक्ति मी धनुर्धरा । प्राप्यु जैसा " तसाच वरील मंडळींस त्या त्या उत्कट भावनेनेंही मी 'प्राप्यु' आहें असें सांगून देव पुढें म्हणतात " अगा मी एकुलाणीचें खागें । मज येवो पां भलतेनि मार्गें । भक्ती कां विषयविरागें । अथवा वैरें ॥ म्हणोनि पार्था पाहीं । प्रवेशावया माझ्या ठायीं । उपायांची नाहीं । वाणी एथ ॥ अगा कवणें एकें बोलें । माझेपण जऱ्ही जाहलें । तरी मी होणें आलें । हाता निरुतें, " असो. तेव्हां अशा तऱ्हेचा " छंद "-- " भवबंध तुटोनिया " जाणारा छंद--गोपिकांस श्रीकृष्णाचा लागलेला होता, तेव्हां ह्या छंदाचा परिणाम म्हणजे " ब्रह्मनिष्ठाचें दिव्य तेज त्यांच्या देहावर विलसूं लागलें " यावांचून दुसरा काय होणार ? " गोविंद गोविंद । मना लागो हाचि छंद " ह्या अभंगांत तुकोबांनीं " तुका म्हणे आळी । जेंवि नुरेचि वेगळी " असा दृष्टांत देऊन--व्यवहारांतला उघडा दृष्टांत देऊन--अशा ' छांदिष्ट ' मनुष्याची ' काया ' देखील ' गोविंद ' होते असें म्हटलें आहे--ही वर्णनाची हद्द झाली.

अशा रीतीनें गोपींचें प्रेम दिव्य--उत्कट होतें. त्यांच्या प्रेमाचा पूर इतका अपार होता कीं, त्यांतला एक बिंदु जरी कोणा मानवास प्राप्त झाला तरी तो आपणांस धन्य धन्य मानील ! त्या उच्च, उदात्त व उत्कट प्रेम-तरंगिणीचें वर्णन एकदां कबीरजींना करण्याचा प्रसंग आला. कबीरजींची रामभक्ति--कृष्णभक्ति कांहीं लहान-सहान नव्हती. ते थोर अधिकारी पुरुष होते. " नेत्रीं जळ वाहो सदा । आनंदाचे रोमांच " अशी त्यांची स्थिति होती. परमेश्वराच्या ध्यानांत गुंगून सात्विक प्रेमाश्रूंचा पूर त्यांच्या नेत्रांतून धरणीवर लोटत होता ! अशा स्थितींत कबीरजींची स्वारी एकदां रस्त्यानें चालली होती. शिष्यांचें वर्तुळ त्यांच्याभोंवतीं " कबीरजी ! कबीरजी ! " करून नाचत होतें. कबीरांच्या या अद्भुत कृष्णभक्तीनें थक्क होऊन " काय ही कबीरजींची कृष्णभक्ति ! " अशा तऱ्हेचे उद्गार शिष्यवृंदांतून निघत होते. " अरेरे ! " आपल्या शिष्यांकडे वळून ते म्हणतात, " कबीर कबीर क्यां कहे ले गये जमुनातीर । एक एक गोपीसें प्रेममें बहगय कोट कबीर ! " कोट्यावधि कबीरांचें प्रेम एका एका गोपीच्या वांट्याला आलें होतें. " बाळांनो ! " कबीर म्हणाले " असे कोटयावधि कबीर एका एका गोपीच्या प्रेमात--त्या दिव्य-स्वर्गीय, उत्कट प्रेमांत वाहून गेले आहेत बरें ! ' कबीर कबीर ' म्हणून माझी

तुम्ही कसची स्तुति करतां ? यमुनातीरीं असणाऱ्या वृंदावनांतील गोकुळींच्या व्रजांगनांच्या प्रेमाच्या पासंगासही मी पुरणार नाहीं ! " कबीरजींचा विनय व कदाचित् त्यांच्या भाषेंतील असणारी अतिशयोक्ति हीं जरी सोडून दिलीं तरी त्यावरून गोपींच्या प्रेमाचा अधिकार केवढा दांडगा होता, त्या प्रेमाचें स्वरूप किती उज्ज्वल व उत्कट होतें याचा चांगलाच उलगडा होतो.

अशा तऱ्हेच्या उत्कट प्रेमाच्या मूर्ती गोपी होत्या. ज्ञानोबा म्हणतात त्याप्रमाणें " जयांचिये वाचे माझे आलाप । दृष्टीं भोगी माझेंचि रूप । जयांचें मन संकल्प । माझाचि वाहे " अशी त्यांची स्थिति होती. गोपिकांनीं आपलें " चित्त मनोबुद्धी-सहित " परमेश्वरास अर्पण केलें होतें. व प्रत्येक ' निमिषा ' ला कृष्णकन्हय्याच्या ध्यानाच्या वाढत्या आनंदावरोबर " तेतुलें अरोचक विषयीं घेइल " अशी त्यांची स्थिति झाली होती. विषयबुद्धि मनांत धरून ईश्वराचें चिंतन करावयास आलेल्या गोपी विषय-विरक्त झाल्या होत्या ! व म्हणूनच क्षणोक्षणीं परमेश्वराचें " सुख देखिलेल्या " गोपींना " सन्निध स्वपती असतांही " त्या विषयसुखांत गोडी वाटेना ! त्याहून उच्च प्रतीचें सौख्य त्यांच्या हातीं आल्यामुळें- त्या सुखाची गोडी त्यांनीं चाखिल्यामुळें- त्यांना विषयानंदांत सौख्य वाटूं नये हें साहजीकच- ओघानेंच आलें. कारण " जेणें कदा चाखिलि न सुधा तोचि नर दुधा दह्यातें सेवी; " इतर नाहीं. त्या उच्च सुखाची कल्पनाही नसणाऱ्या मानवांनीं विषयांतच मिटक्या माराव्यात हें साहजीक आहे. किंबहुना फुलेवालीच्या पाटींतील फुलांच्या सुगधाच्या दर्पानें चिडून जाऊन आपल्या उशाशीं मासोळ्यांच्या पाट्या घेऊन त्या सुगंधा ( ! ) च्या आस्वादांत आनंदानें झोंपी जाणाऱ्या मासेविक्या बायांप्रमाणें त्या दिव्य आनंदाचा-तो कोठें दृष्टीस पडल्यास-- आम्हीं तिरस्कार करावा हेंहि साहजीकच आहे. दोघां-चीही कींव करावी तितकी थोडीच: किंबहुना त्या मासेविक्या बाईस-- तिच्या अर-सिकपणास--हंसणाऱ्या आम्हांस आम्ही स्वतां तिच्याही वर ताण करीत आहों हें दिसत नाहीं हें केवढें आश्चर्य ! परंतु परमेश्वराच्या ध्यानांत, परमेश्वराच्या चिंतनांत, परमेश्वराच्या अखंड भजनांत, परमेश्वराच्या संगतींत किती सौख्य आहे-- किती मौज आहे, केवढा आनंद भरला आहे याची कल्पना हवी असेल तर मुक्तिसुखावर लाथ मारून " मी भक्त तूं देव ऐसें करी " म्हणून ईश्वराचें भजन करण्यांसाठीं सर्व साधुसंतांची केवढी तळमळ होती, " झणे मुक्तिपद देशी तूं अनंता. " " आम्हांला तुझी सायुज्यमुक्ति नको; तर तुझ्या कीर्तनाचा आनद भागूं दे; कारण त्यांत जो

आनंद आहे तो त्या मुक्तींतही नाहीं " अशा तऱ्हेचा केवढा आग्रह नामदेव-तुकारामादि साधुसंतांनीं देवापाशीं धरलेला होता तो पहावा म्हणजे कळेल. ज्ञानोत्तर-भक्तीची-- अद्वैतभाव कळूनही द्वैतांत जी गम्मत आहे त्याची--गोडी कांहीं औरच आहे. खुद्द परमेश्वरासही ह्या आनंदाच्या गोडीचा अनिवार मोह असे व गीताकथनप्रसंगीं प्रेमभरानें अर्जुनाला दृढालिंगन देऊन दोघांचें ऐक्य करूं पाहणाऱ्या देवानींही असें अद्वैत झाल्यावर द्वैतांतील आनंद चाखावयास मिळणार नाहीं म्हणून " आलेली ही उर्मी-- हा उमाळा-- माझा माझ्याच ठायीं जिरो " अशा तऱ्हेचे उद्गार काढल्याचें ज्ञानेश्वरींत जें वर्णन आहें तें ह्याचेंच दर्शक आहे. अस्तु.

तेव्हां अशा तऱ्हेचा दिव्य आनंद मनमुराद लुटण्यास गोपी नेहमीं एका पायावर तयार असत हें काय सांगायला पाहिजे ? कारण आपल्या ह्या संसाराच्या विविध व्यापांत चित्ताला खरी शांती, खरें सुख, व खरा आनंद यांची अहर्निश तळमळ लागलेली असूनही तें कोणासही मिळत नाहीं. तें हवें असेल तर त्या ईश्वरी सुखाकडेच धांव घेतली पाहिजे. राजाच्या राजवाड्यापासून तों शेतकऱ्याच्या झोंपडीपर्यंत प्रत्येक मनुष्याला असें वाटत असतें कीं " माझें कांहीं तरी हरवलें आहे; ' पण तें हरपलेलें चित्सौख्य धुंडाळण्यासाठीं तो बापडा पुन्हां त्याच विषयमृगजलांत उडी घेतो ! गरीब बिचारा !

पण अशाहि स्थितींत गोपींसारख्या भाग्यवान् प्राण्यांना तें खरें ' सुखनिधान ' सांपडतें. व एकदां तें सांपडल्यावर मग त्या आनंदाला काय विचारतां ? मग अशा प्राण्याला संसारही नकोसा होतो; व त्या सौख्यसमुद्रांत--त्या अमृतसागरांत- कितीही बुड्या मारल्या तरी पुरेशाच वाटत नाहींत. संसारतापांनीं तापलेल्या गोपींसारख्या जीवांना तो एक शीतल विश्रांतीचा आधार असतो. म्हणूनच गोपी त्या कृष्णकन्हय्याच्या ध्यानांत सदा रंगलेल्या असत व कृष्णाची त्रैलोक्यमोहिनी मुरली वाजली किंवा त्याची सुंदर मूर्ति दृष्टीस पडली कीं गोपिका तन्मय होऊन जात ! त्यांच्या हातांतलें काम विसरून जाऊन जिकडून तें मधुरतम संगीत ऐकूं आलें तिकडे करतालिकांच्या नाचावर- तालावर- त्या चालूं लागत ! गोपींसारख्या मानवांनाच नव्हे तर " गोधनीं बहु पुढें नच जावें । ठाव एकचि धरूनि थिजावें," ह्या पंडितवर्णनाप्रमाणें गाईंना देखील जागच्या जागीं थबकायला लावण्याची मोहनी कन्हय्याच्या मुरलीत होती !

रासक्रीडेचा प्रसंग अशाच बहारीचा होता. शरदृतूंतले ते दिवस. मध्यरात्रीची वेळ झाली होती. सर्व जग निद्रानंदांत विलीन झालें होतें. श्रीकृष्णप्रभूच्या ध्यानानंदांत गुंगत गुंगतां सर्व दिवसाच्या श्रमांचा परिहार करण्यासाठी निद्रादेवीनें गोपींचा देह आपल्या ताब्यांत घेतला होता. पण त्या गोपींची बुद्धि व त्यांचा आत्मा झोपेंतही कन्हैय्याच्या श्यामसुंदर मूर्तीच्या ध्यानांत गुंग झाला होता--व्रजांगनांना त्याच परमेश्वरी सुखाचीं सुखस्वप्नें पडत होतीं ! व त्यामुळें त्यांच्या मुखावर--हृदयविकारदर्शी शुभ्र आरशावर--त्यांचें प्रतिबिंब मंदस्मिताच्या रूपानें उमटत होतें ! त्यांच्या त्या सुमंद हास्यानें किंचित् बाहेर दिसणाऱ्या अशा कुंदकलिकासदृश शुभ्र दंतपंक्तींच्या चांदण्याची मुखावर विलक्षण शोभा विलसत होती ! आज पूर्णचंद्ररजनी होती. उघड्या टाकलेल्या गवाक्षद्वारांतून येणारें शुभ्र चंद्रकिरण त्यांच्या मुखांवर पसरून त्यांच्या मंदस्मिताच्या प्रभेशीं मिलाफ पावत होतें ! आज पौर्णिमेचा दिवस असल्यामुळें वसुंधरा सुधांशूच्या रजतधारांच्या अमृतजलानें सुस्नात होत होतो. ' निरभ्र शारदी रात्रीं ' सर्वत्र पिठासारखें शुभ्र चांदणें पडलें होतें. सर्वत्र शांत निस्तब्धता वसत होती. यमुनेच्या श्यामल जलांवर-कृष्ण कन्हैय्याच्या श्यामकांतीशीं जणूं तद्रूप झालेल्या त्या श्यामवारिपृष्ठांवर–निशानाथ तारकापतीचे चंद्रकिरण नाचत होते ! निशीथवायु मंदमंद वाहून तरंगभंग करीत होता ! त्या सुखददृश्यांत अवगाहन करीत कृष्णप्रभूची स्वारी नदीतटाकीं उभी होती ! नदीकांठचा वालुकाप्रदेश, दूरवर दिसणारी वृक्षराजी, जवळच असलेला गोवर्धन पर्वत, कलकल संगीतानें श्रीहरीस सुखविणारी यमुना, व खुद्द भगवान् या सर्वांना सुधांशु आज अमृताचा अभिषेक घालीत होता. श्रीकृष्णप्रभूनीं तें दृश्य--तें रमणीय चित्ताल्हादक दृश्य -हास्यमुखानें क्षणैक अवलोकन केलें ! त्यांनीं सुनील आकाशाकडे दृष्टि फेंकली. नलिनभोमंडलाच्या विस्तीर्ण पटावर लक्षावधि तारकांचा सलज्ज चमचमाट सुरू होता ! सर्वांच्या मध्यभागीं तारकानाथ विराजत होता ! आपल्या पतीला मध्यें घालून तारकासुंदरींनीं जणों त्याच्या भोंवतीं सुशील नृत्याचा फेर आकाशप्रांगणांत धरला होता ! सुधांशूच्या दिव्य मुरलीच्या तालावर चाललेलें तें स्वर्गीय नृत्य पाहून प्रभूनीं मंद स्मित केलें ! " तारकांनो ! तुमच्यासारख्या दिव्य अप्सरा मजजवळ नाहींत असें तुम्हांस वाटतें काय ? ह्या पहा, आतांच मी त्यांना बोलवतों व मग पाहूंया कोणाचा नाच सरस ठरतो तें ! " असें म्हणून श्रीकृष्णानीं आपली भुवनमोहिनी मुरली काढली व ती वाजविण्यास सुरवात केली !

क्षणार्धांत शेंकडो गोपी त्या मुरलीच्या तालावर करतालिका वाजवीत नाचत--डोलत-निघाल्या ! मुक्तकेशपाश पाठीवर रुळत आहे, खांद्याखालीं पदर गळलेला आहे, पण त्या बेभान अवस्थेंत याची स्मृती कोणाला असणार ? त्या मुरलीच्या दिव्य नादानें मंत्रमुग्ध होऊन त्यांचे पाय त्या दिशेला नाचत चालले होते, शरीर हर्ष-रोमांचित--पुलकित–होऊन नाचाच्या तालावर डुलत होतें, मन व बुद्धि यांचा कृष्ण-स्वरूपीं लय झाला होता ! प्रेमाचें केवढें हें मोहन ! सर्व विश्वांतील अणुपरमाणु ज्या प्रेमाकर्षणानें एकत्र खेंचले जातात त्याच प्रेमाच्या दिव्य समाधींत नाचत–डुलत गोपी चालल्या होत्या ! अहाहा ! त्या समाधींतील तें दिव्य डोलन ज्या मानवाला लाधेल तो खरा भाग्यवंत ! हरिनामाच्या तालाची ही केवढी तल्लीनता ! ज्यांच्या हृदयां-तील परमार्थरस शुष्क होऊन गेला आहे, हरिनामाचें दिव्य संगीत ज्या अभागीं जीवांनीं सबंध जन्मांत कधीं ऐकलें नाहीं त्यांनीं हें श्रीकृष्णचरित्र न वाचलेलेंच एक-परी चांगलें; कारण तें " अरसिकेषु कवित्वनिवेदनं " व्हायचें ! पण हरिभक्तीचा ओलावा ज्यांच्या हृदयांत थोडासा तरी आहे त्यांनीं " जय जय रामकृष्णहरी ! " ह्या मृदंगाच्या ठेक्यावर चालणाऱ्या स्वर्गीय भजनाचे वेळची आपली स्वतःची मनःस्थिति आठवावी, पंढरीच्या वाळवंटावर ह्याच दिव्य भजनाच्या तालावर लाखदी-डलाख वारकरी तासचे तास डुलत असतांना पाहून प्रत्यक्ष नास्तिकसुद्धां त्यांत कसा रंगून जातो–तन्मय होतो–हें लक्षांत घ्यावें म्हणजे गोपींच्या दिव्य समाधींतील आनंदाच्या स्वेच्छ डोलनाची त्यांस खरी कल्पना येईल. त्याच दिव्य तंद्रीच्या तालांत आपल्या स्वर्गीय नाचानें तारकांसही लज्जित करीत गोपी लवकरच वाळवंटावर-जेथें प्रभु " अंगवक्र अधरीं धरि पांवा " असे उभे होते तेथें येऊन पोंचल्या व त्याच उन्मादावस्थेंत कन्हय्याच्या भोंवतीं त्यांनीं नृत्याच्या फेर धरला ! त्या नाचाला जास्त बहार किंवा रंग चढावा म्हणून अनंतांनीं आपलीं अनंत रूपें प्रकट केलीं व प्रत्येक गोपीबरोबर एक एक कृष्ण तो दिव्य नाच नाचूं लागले ! मध्य-वर्ती कृष्णाच्या मुरलीच्या तालावर कृष्णगोपींचा तो अलौकिक नाच संगीतयुक्त सुरूं झाला तेव्हां " वाद्यें वाजविती सुर गोपींसी गाय जें हरी रासीं । स्वर शोभला स्वरांशीं जैसेंचि शरीर तच्छरीरांशीं ! " आपला आकाशप्रांगणांतील नाच व " तारकांचें गायन " यापुढें कांहींच नाहीं असें वाटून तारका व तारकापति यांनीं तो केव्हांच उधळून देऊन त्या तारका पृथ्वीवरील तारकांचें तें दिव्य नृत्य आपल्या तेजपूर्ण नयनांनीं पाहूं लागल्या ! त्या दिव्य नाचाचे वेळीं सर्व सृष्टिही त्यांच्या सुखांत भर घालण्यास

झटूं लागली. निशावायूच्या लहरी कृष्णगोपींच्या गात्रांस सुखविण्याचा यत्न करूं लागल्या, त्यांच्या वसनांशीं व मुक्त अलकराजींशीं स्वेच्छ क्रीडूं लागल्या. यमुनेनें आपल्या कलकलरवाच्या संगीताची मुरलीच्या संगीतांत भर घातली !

त्या दिव्य नृत्याचें आम्ही कोठवर वर्णन करणार ? जगाच्यां प्रारंभापासून जगाच्या अंतापर्यंत जरी असा नाच नाचत राहिलें तरी तो पुरेसा वाटणार नाहीं. असा हा हृदयाचा दिव्य नाच चालूं असतां " हा जीव ठायींच्या ठायींच विरावा " असें कोणास वाटणार नाहीं ? कविराज रे. टिळक म्हणतात " नर्तना । हर्षवर्तना। करीना प्राणी । नच अन्य अभागी त्यासम जगतीं कोणी ! " खरें आहे; कविराज, आपली वाणी खोटी कशी असणार ? त्या दिव्य नर्तनाच्या—स्वर्गीय समाधींतील डोलनाचा आनंद ज्यानें कधींच चाखला नाहीं तो मनुष्य खरोखरच अभागी ! त्या रासक्रीडेचा आनंद भोगतां भोगतां किती काळ गेला याचा पत्ताच नाहीं. "ती रासक्रीडेची राती । म्यां ब्रह्मषण्मास केली होती । " असें भगवान्च आपल्या मुखानें नाथांकडून सांगत आहेत. पण इतका अपरिमित काळ मिळूनही " गोपिका अर्धक्षणमानिती । लवकरी कां गभस्ती उगवला ! " केवढी ही मौज ! ह्या समाधीसुखाला जगांतल्या इतिहासांत तोड सांपडेल काय ? अस्तु.

अशा तऱ्हेचा आनंद ज्या प्रभूच्या संगतींत लुटायला सांपडत असे त्या श्यामसुंदर कन्हय्याची मूर्ती पाहण्यासाठीं-- तें " हरिवदन पहाया सर्व दृष्टी भुकेल्या " असाव्यात व श्रीकृष्णप्रभूची ती मदनमोहन आकृती कुठें क्षणैक दृष्टीआड झाली— व गोपगोपींची परीक्षा पाहण्यासाठीं मुद्दामही देव कधीं कधीं तसें करीत असत — तर गोपींचा —सर्व गोकुळाचा जीव कासावीस होऊन जावा व " बतादे सखी कोन गली गये श्याम " " सखे, तो कृष्ण कान्हा कुठें गेला तो तूं पाहिलास कांग ? तो कुठें दिसत नाहीं " असें म्हणत त्यावांचून न करमून त्यांनीं एकमेकांस प्रश्न करीत सुटावें हें किती साहजीक आहे ? आपल्या पुढील कार्यासाठीं श्रीकृष्णप्रभू ज्या वेळेस वृंदावनांतून मथुरेस निघाले व पुढें द्वारकेस गेले त्या वेळेस त्या विरहाच्या कल्पनेनें व पुढें प्रत्यक्ष विरहानें सर्व गोकुळाची कशी शोचनीय स्थिति झाली, गोपींच्या करुण विलापानें—" अपि ग्रावा रोदत्यपि दलति व्रजस्य हृदयं " अशा शोकानें पाषाणासही पाझर फुटण्याची कशी वेळ आली त्याचें वर्णन आम्ही लवकरच करणार आहों. तत्पूर्वी ह्या प्रेमसंगीताच्या दिव्य मोहनाचे वर्णनाचा अनावर मोह आतां येथेंच आंवरतां घेऊन आपण त्याच प्रेमाच्या दुसऱ्या कांहीं छटा पाहूं.

त्याच प्रेमाच्या दुसऱ्या छटा म्हणजे देवांशीं ह्या प्रेमसाम्राज्यांत होणाऱ्या रुसण्याफुगण्याच्या 'खेळीमेळी' होत. "बुद्धी जयांच्या जगजीवनांत" अशी बालगोपाल मंडळी "कान्हु संभालले संभाल आपुल्या गाई। आम्ही जातोले जातो घलाला बाई" अशा तऱ्हेनें श्रीकृष्णावर रुसून--खेळांतल्या भांडणादिकांवरून रुसून--त्यास म्हणत असत. पण 'प्रेमगोड' गोपालकृष्ण त्यांचीं मनें तेव्हांच पुन्हां आपल्या मधुर वाणीनें उल्लसित करीत असे.

कंसाची प्रसिद्ध दासी कुब्जा ही आठ ठिकाणीं जिचें अंग वांकडें आहे अशी अष्टांगवक्रा संक्रांतीसारखी एक दासी होती. मथुरेस गेल्यावर श्रीकृष्णानीं तिच्या भोळ्या भावास भुलून तिच्यावर विशेष प्रेम दाखविलें तेव्हां गोपींना जो रागाचा झटका आला तो कांहीं पुसूंच नका. श्रीकृष्णकन्हय्याचें 'तें सुंदर मुख' व ती दिव्य मूर्ती पाहून बिचाऱ्या कुब्जेची इतकी तन्मय वृत्ति झाली कीं तिच्या सर्व भावांचा भोळा लय श्रीकृष्णचरणीं लागला व कृष्णाच्या प्रत्यक्ष शत्रूची ती बटीक असूनही या कृष्णप्रेमाच्या जोरावर ती लवकरच थोर अधिकारास पोंचली. प्रभूच्या घरीं गोरे-काळे, लुळे-पांगळे, पंडित--दगड सगळे सारखेच. ज्यांचा भाव श्रेष्ठ ते त्याला प्रिय. "म्हणोनि भक्ति गा एथ सरे। जाति अप्रमाण" असें त्यानीं म्हटलेंच आहे. "उंच नीच कांहीं नेणें भगवंत। सुटे भाव भक्त देखोनिया" असें तुकोया म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं. परमात्म्याची दृष्टि बाह्य भपक्यावर कधीं भुलत नाहीं. अत्यंत प्रेमळपणानें भिल्लीणीनीं दिलेलीं बोरेंसुद्धां प्रभूनीं रामावतारीं खाल्लीं; प्रेमळ विदुराच्या कण्यासुद्धां कृष्णाशिष्टाईच्या वेळेस प्रभूनीं आनंदानें भक्षण केल्या पण दुर्योधनाच्या वरवरच्या "दाटुनि" केलेल्या "आग्रहा" कडे त्यांनीं लक्ष दिलें नाहीं. त्याजवरून हीच गोष्ट सिद्ध होते. "अपिचेत् सुदुराचारो" "क्षिप्रं भवति धर्मात्मा" व "मां हि पार्थ व्यपाश्रित्य" ह्या श्लोकांवरील ज्ञानोबांची बहारदार टीका वाचावी म्हणजे भगवंत 'भावाचा भुकेला' कसा आहे व यासाठींच तो कुब्जेच्या भावास कसा भुलला हें कळून येतें.

तेव्हां कुब्जेच्या भावास देव भुलले खरे. पण इतर गोपींचा त्या सवतीमत्सरानें कोण तडफडाट झाला. (अर्थात् हीं सर्व रुसणीं फुगणीं प्रेमाचींच आहेत हें लक्षांत ठेवावें.) कुब्जेवर--अष्टांगवक्रा कुब्जेवर देव भाळले ही गोष्ट कळल्याबरोबर एक गोरटी गोपी दुसरीस हलक्या आवाजांत विचारते "बाई सत्य वदसि हें?" नंतर एक निश्वास सोडून ती पुढें म्हणते "प्रभुजन असतां कलंकही शोभे। चंद्रचि पहा जरिहि हा

सक्षय सकलंक दृष्टिही लोभे । " गोपींची निराशा व त्यांचा पारमार्थिक सवतीमत्सर व शेवटीं समाधान मानण्याचा प्रकार यांचें चित्र पंतानीं एखाद्या कुशल चित्रकाराप्रमाणें रेखाटलें आहे. किंबहुना हृदयींचे भाव हे चित्रकारापेक्षांही कवीच कांकणभर अधिक सरस दाखवूं शकतात. एक सखी खट्टू होऊन दुसरीस म्हणते " काय सांगूं सखे ! " कुब्जेच्या भाग्याचा भर भारी आमुचाहिं ओसरला । सरला असोनि वक्रा आम्हीं, वक्रा असोनि ती सरला ! " दुसरीच्या सवतीमत्सराच्या चरफडाटाचा पारा याहूनही वरच्या ' डिग्री 'चा आहे. व त्या भरांत कृष्णास ' घुबड ' म्हणण्यापर्यंतसुद्धां तिची पायरी जाऊन पोंचली आहे. " दासी असो नसो परि जन कुब्जा म्हणति काय ती कुबडी । विदरीहि कामुका स्त्री घुबडाला काय नावडे घुबडी ? " पण शेवटीं " सखि ती सुखी असो गे श्रीकृष्णाशीं करोनि केलीला ! " असें म्हणून सर्वजण स्वस्थ बसल्या आहेत--किंबहुना " सक्षय सकलंक " अशा विधूकडे लोभावलेल्या दृष्टीनें पहाणाऱ्या चकोरीप्रमाणें त्या प्रेमाचा विरह झाल्यामुळें त्यांचे देह वाळून गेले आहेत व ' जीवनावेगळी ' झालेल्या ' मासोळीं 'प्रमाणें त्यांची तळमळ झालेली पुढें आपणांस वाचावयास मिळणार आहे. अस्तु.

प्रियवाचक ! अशा तऱ्हेच्या प्रेमळ प्रसंगांतून त्या प्रेममय प्रभूला काढून पुढील भागांत आम्हांस त्यास मथुरेस घेऊन जावें लागणार आहे हें पाहून आम्हांसही वाईट वाटतें. त्या गोपींच्याबरोबर आमचेंहि हृदय भरून येतें. पण चरित्रलेखकाचें कार्य मोठें कठिण असतें, त्याला असले कठिण प्रसंगहि वर्णावे लागतात त्याला त्याचा नाइलाज असतो. कारण जशी गोष्ट घडली तशी सांगणें त्यास भागच असतें. तर चला वाचक ! घट्ट मन करून तो विरहवर्णनाचा देखावा पहाण्यास चला.



# भाग चवथा.



श्रीकृष्ण जो जो मोठे होऊं लागले व आपण धाडलेले मोठमोठे राक्षसहि त्यांनीं ठार केल्याचें जेव्हां कंसास कळलें तेव्हां कंसाच्या हृदयाचा भयानें थरकांप झाला. व आपला मृत्यु जिवंतपणें गोकुळांत वावरत आहे व वाढत आहे व त्यापुढें आपल्या उपायांची कांहींच मात्रा चालत नाह[illegible]न त्याच्या पोटांत सारखें धस् धस् करीत होतें. व खातांपितां, बसतांउठतां त्यास सगळीकडे कृष्ण दिसत होता. कुठें कांहीं खुट् वाजलें कीं "कृष्ण आला कीं काय" असा त्यास भास होई. कृष्ण आतां काय करतो आहे, मग काय करतो आहे याची रावणाप्रमाणेंच तोहि आपल्या गुप्त हेरांकडून वारंवार बातमी ठेवीत असे. तथापि अवशपणें मृत्यूच्या जबड्यांत उभे असतांही त्यांतून सुटण्यास नैराश्यपूर्ण धडपड प्रत्येक मानव करतोच. त्याप्रमाणें आमचा कंसही आपल्याकडून होतील ते निष्फळ यत्न करीत होता. उदाहरणार्थ, अगदीं शेवटींसुद्धां त्यानें आपला भाऊ केशी ह्यास कृष्णास मारण्यास धाडलें होतें. पण केशीच्या भयंकर घोड्यास व केशीस कृष्णांनीं एकदमच ठार केलें होतें. तेव्हां कंसाला म्हणजे आतां विशेष आशा राहिली होती अशांतला अर्थ नाहीं. त्याला आपला मृत्यु उघड उघड डोळ्यांपुढें दिसत होता व आज नाहीं उद्यां आपण त्या श्रीकृष्णाच्या हातून मरणार असाच ध्वनि त्याच्या अंतरात्म्यांतून उठत होता.

होतां होतां कंसाच्या मृत्यूची व गोपींच्या विरहाची वेळ जवळ येऊन ठेपली. कंसाला श्रीकृष्णाचा वैरी या नात्यानें किती ध्यास लागला होता हें आम्हीं वर सांगितलेंच आहे. शेवटीं दिव्याच्या जवळ जवळ गेलेला पतंग ज्याप्रमाणें त्या दीपावर शेवटची झडप घालतो व स्वतः अग्निस्वरूप बनन जातो त्याप्रमाणें कंसानेंहि श्रीकृष्णाशीं व बलरामाशीं मल्लयुद्ध खेळण्याचा घाट घातला व त्यांत आपली आहुती दिली. आपला शत्रु, मृत्यु, कृतांत म्हणून कां होईना पण कंसाला गोपींच्या इतकाच कृष्णाचा ध्यास लागला होता. प्रेमानें व भयानें लागणाऱ्या ध्यासाचा परिणाम एकच; प्रकार निराळे एवढेच. पण प्रेमाच्या इतकाच जर भयाचा ध्यास आहे तर फळही तेंच कां न मिळावें? कारण परमेश्वर इतका 'उदारांचा राणा' आहे कीं भक्तांस आणि वैऱ्यांस दोघांसही त्यांच्या उत्कट ध्यासाबद्दल तो तेंच मोक्षप्राप्तीचें बक्षीस देतो. पण इतका दुष्टपणा अंगीं असणें—आमरणांत ईश्वरद्रोह करण्याइतका खंबीरपणा

मनांत असणें—ही कांहीं लहान सहान गोष्ट नव्हे. पश्चात्तापाचा वाराहि अंगास स्पर्शू न देतां, भक्तीच्या मलयानिलाचा वासहि न घेतां प्रत्यक्ष परमेश्वरांस अवतार घ्यायला लावण्याइतका तीव्र विष्णुद्वेष अंगीं असणें ही एक तामसी तपश्चर्या आहे—ही तामसी असहकारिता आहे--व सहकारितेप्रमाणेंच असहकारितेचें स्वातंत्र्य-मुक्तिसुख हेंच अखेरचें फल आहे. तेव्हां "तया कंसा भयसंभ्रमें" श्रीकृष्ण "प्राप्यु" झाला हें ईश्वराच्या उदार साम्राज्यांत योग्यच झालें. असो.

कंसानें--कृष्णध्यासानें वेडा झालेल्या, विरोधी भक्तीच्या पराकोटीस पोंचलेल्या कंसानें—अक्रूर नांवाच्या इसमास कृष्णबलरामांस मथुरेस घेऊन येण्यास धाडून दिलें. अक्रूर गोकुळांत नंदगृहीं आला व त्यानें कंसाचा हुकूम नंदांस कळविला. राजाज्ञेस मान देऊन नंदाला आपलीं बालकें धाडणें भागच होतें. हां हां म्हणतां ही बातमी सर्व गोकुळभर झाली. मग त्या शोकाला काय विचारतां? सगळाकडे एकच हाहाःकार झाला! गोपिकांना, गोपांना, नंदयशोदेला अन्नपाणी सुद्धां गोड लागेना. प्रातःकाळीं जेव्हां श्रीकृष्णबलरामांस रथावर घालून अक्रूराची स्वारी निघाली त्या वेळेस सर्व गोकुळ शोकानें भरून गेलें. गाईवांसरांचा गोपाळ आज त्यांना सोडून जाणार म्हणून विचारीं गाईवांसरेंसुद्धां ढळढळां रडूं लागलीं! गोपी त्या अक्रुरांस म्हणाल्या "तुझें ठेविलें नाम अक्रूर। परि तुजसारिखा नसे निर्दय थोर." यशोदेला भडभडून येऊन ती म्हणते "मम सांवळे कान्हाई। जगन्मोहने कृष्णाबाई। तुझे गुण आठवूं किती काई। मिती नाहीं तयांतें॥" असें श्रीधर कवि म्हणतात. "जीवनावीण मीन जैसे। गोकुळींचे लोक तळमळती तैसे। यशोदेशीं मूर्च्छा येतसे। धांवतसे रथापाठीं॥ माझे विसाविया जगजीवना। तुझें मुख पाहों दे मन-मोहना। येई मज प्रेमाचा पान्हा। पाजूं कोणा सांगपां?॥ माझे सांवळे कान्हाई। उभी राहे कृष्णाबाई। तुजवेगळ्या दिशा दाही। वोस झाल्या मज आतां" अशा रीतीनें यशोदेचा विलाप श्रीधरानीं आपल्या "भोळ्याभाबड्यांस रडविणाऱ्या" भाषेंत वर्णिला आहे! तो वाचून कोणाचे बरें नेत्र पाण्यानें भरून येणार नाहींत! गोपीकांचा विलाप श्रीधर कवि वर्णितातः—"तंव गोपिका आल्या धांवत। दोहीं हातीं हृदय पिटित। कितीएक पडती मूर्च्छागत। थोर प्राणांत ओढवला॥ एक धरणीवरी लोळती। एक दीर्घ स्वरें हांका देती। एक अवनीवरि कपाळ पिटिती। प्राणांतगती ओढवली॥ एक म्हणती गेला सांवळा। आतां अग्नि लावा गोकुळा......हा चांडाळ अक्रूर परियेसी। अकस्मात कोठोनि आलासी।

आहा गोकुळीचा प्राण नेतोसी । निर्दय होसी तूं साच " ह्याप्रमाणें गोपींच्या शोकक्षोभाची हद्द झाली आहे. नामदेव त्याच प्रसंगाचें वर्णन करतात:—" गौळणींचा मेळा मिळाला सकळ । पिटिती कपाळ आपुले हातीं ॥...आम्हां सोडोनीयां तूं रे कैसा जासी । तुजवीण पिशी आम्ही सर्व ॥ कोणी रथापुढें जावोनि पडती । आक्रोशें रडती सकळीक ॥ अक्रूर नव्हे बाई मोठा असे क्रूर......अक्रूरा आम्ही सर्व पसरितों पदर । नेऊं नको श्रीधर मथुरेसी. "

नाथ त्याच स्थितीचें अत्यंत करुण वर्णन खालील प्रमाणें करतात:- " ते त्यांची व्यथा सांगतां । मज अद्यापि धीर (न) धरवे चित्तां । ऐसें देवो सांगत सांगतां । कंठीं बाष्पता दाटली ॥ मज मथुरे जातां देखोनी । आसुवांचा पूर नयनीं । हृदय फुटे मजलागुनी । प्रेमें लोळणी घातली ॥ पोटांतील परमप्रीति । सारितां मागें न सरती । धरिलें चरण न सोडिती । येती काकुळती मजलागीं ॥ ......लाज विसरल्या सर्वथा । सासुरा पिता पति देखतां । माझे चरणीं ठेवूनि माथा । रडती दीर्घता आक्रंदें ॥ मजवीण अवघे देखती वोस । माझी पुनः पुन्हा पाहती वास । थोर घालोनिया श्वास । उकसाबुकशी स्फुंदती ॥ ...... उभ्या ठाकोनि सन्मुख । माझें पाहती श्रीमुख । आठवें वियोगाचें दुःख । तेणें अधोमुख विलपती ॥ "

वरील हृदयस्पर्शी वर्णनें वाचून ज्याचें मन हेलावणार नाहीं असा हतभागी अहृदय प्राणी कोणी असेल काय? श्रीकृष्ण मोठ्या प्रेमानें, उल्हासानें, सद्गदित कंठानें व ' बाष्पवृत्तिकलुष ' अशा नयनानें गोपिकांचा उल्हास व त्यांची अनन्यभक्ति वर्णून मग वरील वियोगदुःख सांगत आहेत असा हा प्रसंग आहे ! " अहाहा ! " श्रीकृष्ण उद्धवास म्हणतात " उद्धवा ! तुला त्यांचें प्रेम काय सांगूं रे. माझ्या प्रेमानें वेड्या झालेल्या, माझ्या रूपानें भुललेल्या व माझ्या बांसरीच्या संगीतांत गुंगलेल्या अखिल गोकुळाचें व त्याच्या वियोगकालीन दुःखाचें मी कुठवर वर्णन करूं ? तिन्ही त्रिकाळ माझें दर्शन घडत असल्यामुळें त्या गोपांच्या आनंदाला पारावारच नव्हता. त्याचप्रमाणें उद्धवा ! माझ्या वेणुनादानें गाई तन्मय होऊन उभ्या रहात, वांसरें स्तनपान विसरत, वाघ आणि हरीण त्याच मुरलीच्या संगीतांत गुंगून एकमेकांच्या खांद्यावर मान टाकून बसत तो देखावा किती अपूर्व दिसे म्हणून सांगूं ? आणि त्यांत भर घालण्यासाठीं तितक्यांत गोपीहि त्या मुरलीच्या छंदावर नाचत येऊन माझ्या भोंवती उभ्या रहात असत ! " हें दिव्य प्रेम, ही तल्लीनता, हा संगीतोन्माद आम्हां हतभागी प्राण्यांस कधीं मिळेल काय ? " एक एक गोपीसे प्रेममे वहगय कोट

कबीर ! " असें कबीरांनीं उगीच कां म्हटलें आहे ? " कृष्ण कृष्ण इति पल्लव डोलती " असा त्या प्रभूच्या दिव्य मोहनाचा प्रतापच होता. "उद्धवा ! " देव पुढें सांगतात– " माझ्यासमोर प्रेमोल्लासानें नाचलेले मोर, गोपिकांशीं लपंडाव खेळलेल्या त्या गुल्मलता, किंबहुना मी ज्या गवतावरून चाले तें गवतसुद्धां माझ्या संगतीनें उद्धरून गेलें बरें ! पण उद्धवा ! अशा प्रेमळ गोकुळास–नाथमुखानें हारि म्हणताततः-- " ऐसियासि म्यां अतिनिचाडता । कृतघ्नाचे परी सांडून जातां । माझ्या वियोगकाळींची कथा । व्यथें पाहतां पाषाण उतटी ! " अस्तु.

श्रीकृष्णप्रभूस मारण्यास काय युक्ति करावी ह्या विचारानें वेडा झालेल्या कंसास त्याच्या कपटपटु मंत्र्यांनीं सल्ला दिली कीं " प्रधान म्हणती धनुर्याग । आरंभावा सवेग । बळराम आणि श्रीरंग । आदरें करूनि आणावें ॥ " आणि मग " नम्र वचन बोलूनि त्यांतें । शेवटीं घात करावा. " त्याप्रमाणें कंसानीं अक्रुरास--सत्वस्थ, सज्जन व ईश्वरभक्त अशा अक्रुरास–त्यांना आणायला धाडलें. त्या वेळेस अक्रुरास प्रथम वाईट वाटलें-- " मनीं चिंता वाटे थोर । कंस चांडाळ दुराचार । बळराम आणि यदुवीर । दोघे सुकुमार कैसे आणूं? " पण मागून श्रीकृष्णाचें अद्भुत चरित्र आठवल्यावर मात्र " म्हणे आजि धन्य नयन । देखेन वैकुंठींचें निधान । पूर्ण ब्रह्म सनातन । मी पाहेन डोळेभरी ! " नंतर अक्रुराची स्वारी दिव्यरथ घेऊन झपाट्यानें निघाली. गोकुळाच्या वनाजवळ अक्रूर आला तोंच " देखिला त्रिभुवननाथ डोळां । जीमूतवर्ण घनसांवळा । रुळती आपाद वनमाळा । गोरजें डौरला वदनचंद्र ॥ उदार श्रीमुख आकर्ण नयन । कुंडलासभोंवतीं किरण । हरितनूचा आश्रय पूर्ण । अलंकार घवघवीत ॥ " या श्रीधरांच्या सुंदर वर्णनानें सजलेल्या प्रभूच्या ध्यानांत कोणचा भक्त मग्न होणार नाहीं ? नामदेव त्याच स्थितीचें अधिक काव्यमय वर्णन करतात–" तनू हे आकाश चंद्रमा तें मुख । ऐसें निष्कलंक परीक्षिती ॥ १ ॥ पूर्णिमेचा चंद्र त्याहूनी अधिक । शोभत श्रीमुख कृष्णजीचें ॥ २ ॥ भोंवता हा शोभे नक्षत्रांचा मेळा । खेळत सांवळा जगद्गुरू ॥ ३ ॥ " तें सुंदर कृष्णमुख पाहून अक्रुराची तृप्तीच होईना ! " जोडोनिया हात घाली नमस्कार । वाहातसे नीर क्षणक्षणां ! " तें पाहून " नामा म्हणे त्वरें धांवे हृषीकेशी । धरित पोटाशीं अक्रूरातें । " सुनील तनूच्या आकाशोदरांत शोभणारा तो वदनचंद्र व त्याभोंवतीं खेळणारीं कृष्णसख्यांचीं तीं नक्षत्रें यांचा आनंद पाहून अक्रुराच्या नेत्रांत सात्विक अश्रु उभे राहिले हें साहजीकच आहे. असो.

आहा गोकुळीचा प्राण नेतोसी । निर्दय होसी तूं साच " ह्याप्रमाणें गोपींच्या शोकक्षोभाचो हद्द झाली आहे. नामदेव त्याच प्रसंगाचें वर्णन करतातः—" गौळणींचा मेळा मिळाला सकळ । पिटिती कपाळ आपुले हातीं ॥...आम्हां सोडोनीयां तूं रे कैसा जासी । तुजवीण पिशी आम्ही सर्व ॥ कोणी रथापुढें जावोनि पडती । आक्रोशें रडती सकळीक ॥ अक्रूर नव्हे बाई मोठा असे क्रूर......अक्रूरा आम्ही सर्व पसरितों पदर । नेऊं नको श्रीधर मथुरेसी. "

नाथ त्याच स्थितीचें अत्यंत करुण वर्णन खालील प्रमाणें करतातः-- " ते त्यांची व्यथा सांगतां । मज अद्यापि धीर ( न ) धरवे चित्तां । ऐसें देवो सांगत सांगतां । कंठीं बाष्पता दाटली ॥ मज मथुरे जातां देखोनी । आसुवांचा पूर नयनीं । हृदय फुटे मजलागुनी । प्रेमें लोळणी घातली ॥ पोटांतील परमप्रीति । सारितां मागें न सरती । धरिलें चरण न सोडिती । येती काकुळती मजलागीं ॥ ......लाज विसरल्या सर्वथा । सासुरा पिता पति देखतां । माझे चरणीं ठेवूनि माथा । रडती दीर्घता आक्रंदे ॥ मजवीण अवघे देखती वोस । माझी पुनः पुन्हा पाहती वास । थोर घालोनिया श्वास । उकसाबुकशी स्फुंदती ॥ ...... उभ्या ठाकोनि सन्मुख । माझें पाहती श्रीमुख । आठवें वियोगाचें दुःख । तेणें अधोमुख विलपती ॥ "

वरील हृदयस्पर्शी वर्णनें वाचून ज्याचें मन हेलावणार नाहीं असा हतभागी अहृदय प्राणी कोणी असेल काय? श्रीकृष्ण मोठ्या प्रेमानें, उल्हासानें, सद्गदित कंठानें व ' बाष्पवृत्तिकलुष ' अशा नयनानें गोपिकांचा उल्हास व त्यांची अनन्यभक्ति वर्णून मग वरील वियोगदुःख सांगत आहेत असा हा प्रसंग आहे! " अहाहा! " श्रीकृष्ण उद्धवास म्हणतात " उद्धवा! तुला त्यांचें प्रेम काय सांगूं. माझ्या प्रेमानें वेड्या झालेल्या, माझ्या रूपानें भुललेल्या व माझ्या बांसरीच्या संगीतांत गुंगलेल्या अखिल गोकुळाचें व त्याच्या वियोगकालीन दुःखाचें मी कुठवर वर्णन करूं? तिन्ही त्रिकाळ माझें दर्शन घडत असल्यामुळें त्या गोपांच्या आनंदाला पारावारच नव्हता. त्याचप्रमाणें उद्धवा! माझ्या वेणुनादानें गाई तन्मय होऊन उभ्या रहात, वांसरें स्तनपान विसरत, वाघ आणि हरीण त्याच मुरलीच्या संगीतांत गुंगून एकमेकांच्या खांद्यावर मान टाकून बसत तो देखावा किती अपूर्व दिसे म्हणून सांगूं? आणि त्यांत भर घालण्यासाठीं तितक्यांत गोपीहि त्या मुरलीच्या छंदावर नाचत येऊन माझ्या भोंवती उभ्या रहात असत! " हें दिव्य प्रेम, ही तल्लीनता, हा संगीतोन्माद आम्हां हतभागी प्राण्यांस कधीं मिळेल काय? " एक एक गोपीसे प्रेममे वहगय कोट

कबीर ! " असें कबीरांनीं उगीच कां म्हटलें आहे ? " कृष्ण कृष्ण इति पल्लव डोलती " असा त्या प्रभूच्या दिव्य मोहनाचा प्रतापच होता. "उद्धवा ! " देव पुढें सांगतात– " माझ्यासमोर प्रेमोल्लासानें नाचलेले मोर, गोपिकांशीं लपंडाव खेळलेल्या त्या गुल्मलता, किंबहुना मी ज्या गवतावरून चाले तें गवतसुद्धां माझ्या संगतीनें उद्धरून गेलें बरें ! पण उद्धवा ! अशा प्रेमळ गोकुळास–नाथमुखानें हरि म्हणतातः-- " ऐसियासि म्यां अतिनिचाडता । कृतघ्नाचे परी सांडून जातां । माझ्या वियोगकाळींची कथा । व्यथें पाहतां पाषाण उतटी ! " अस्तु.

श्रीकृष्णप्रभूस मारण्यास काय युक्ति करावी ह्या विचारानें वेडा झालेल्या कंसास त्याच्या कपटपटु मंत्र्यांनीं सल्ला दिली कीं " प्रधान म्हणती धनुर्याग । आरंभावा सवेग । बळराम आणि श्रीरंग । आदरें करूनि आणावें ॥ " आणि मग " नम्र वचन बोलूनि त्यांतें । शेवटीं घात करावा. " त्याप्रमाणें कंसानीं अक्रुरास--सत्वस्थ, सज्जन व ईश्वरभक्त अशा अक्रुरास–त्यांना आणायला धाडलें. त्या वेळेस अक्रुरास प्रथम वाईट वाटलें-- " मनीं चिंता वाटे थोर । कंस चांडाळ दुराचार । बळराम आणि यदुवीर । दोघे सुकुमार कैसे आणूं? " पण मागून श्रीकृष्णाचें अद्भुत चरित्र आठवल्यावर मात्र " म्हणे आजि धन्य नयन । देखेन वैकुंठींचें निधान । पूर्ण ब्रह्म सनातन । मी पाहीन डोळेभरी ! " नंतर अक्रुराची स्वारी दिव्यरथ घेऊन झपाट्यानें निघाली. गोकुळाच्या वनाजवळ अक्रूर आला तोंच " देखिला त्रिभुवननाथ डोळां । जीमूतवर्ण घनसांवळा । रुळती आपाद वनमाळा । गोरजें डौरला वदनचंद्र ॥ उदार श्रीमुख आकर्ण नयन । कुंडलासभोंवतीं किरण । हरितनूचा आश्रय पूर्ण । अलंकार घवघवीत ॥ " या श्रीधरांच्या सुंदर वर्णनानें सजलेल्या प्रभूच्या ध्यानांत कोणचा भक्त मग्न होणार नाहीं ? नामदेव त्याच स्थितीचें अधिक काव्यमय वर्णन करतात–" तनू हे आकाश चंद्रमा तें मुख । ऐसें निष्कलंक परीक्षिती ॥ १ ॥ पूर्णिमेचा चंद्र त्याहूनी अधिक । शोभत श्रीमुख कृष्णजींचें ॥ २ ॥ भोंवता हा शोभे नक्षत्रांचा मेळा । खेळत सांवळा जगद्गुरू ॥ ३ ॥ " तें सुंदर कृष्णमुख पाहून अक्रुराची तृप्तीच होईना ! " जोडोनिया हात घाली नमस्कार । वाहातसे नीर क्षणक्षणां ! " तें पाहून " नामा म्हणे त्वरें धांवे हृषीकेशी । धरित पोटाशीं अक्रूरातें । " सुनील तनूच्या आकाशोदरांत शोभणारा तो वदनचंद्र व त्याभोंवतीं खेळणारीं कृष्णसख्यांचीं तीं नक्षत्रें यांचा आनंद पाहून अक्रुराच्या नेत्रांत सात्विक अश्रु उभे राहिले हें साहजीकच आहे. असो.

त्यानंतर कृष्णप्रभु जाणार म्हणून गोकुळांत केवढा हलकल्लोळ उडाला याचें वर्णन वर आलेंच आहे. त्या प्रसंगीं " नंद यशोदा बोलत । मथुरेसि नेता श्रीकृष्णनाथ । तेचि क्षणीं आमुचा प्रांणांत । होईल जाण अक्रूरा । " ही कृष्णप्रभूच्या मातापित्यांची स्थिति, किंवा " अक्रूरा देखता घेऊनियां माती । गोपी आपुल्या मुखीं घालिती । म्हणती मनमोहन यदुपती । भेटसी आतां कधीं तूं ? " ही गोपिकांची शोचनीय अवस्था- किंबहुना सर्व गोकुळाचा तो चित्त हेलावणारा विलाप ऐकून नाथ म्हणतात तसें खरोखरच " व्यथें पाषाण उतटी " मग अक्रूरासारख्या सहृदय मनुष्याला भडभडून यावें हें किती साहजीक आहे. श्रीधर म्हणतात " ऐसे देखोनि त्या अवसरां । अष्टभाव नावरती अक्रुरा । नयनीं चालिल्या अश्रुधारा । प्रेम देखोनि गोपिकांचें ! " किती हें सहृदय वर्णन ! असो. परंतु शेवटीं श्रीकृष्णास नेलें हें पाहिजेच--राजाज्ञा व एका दृष्टीनें ईश्वराज्ञाच--अनुल्लंघनीय आहे--हें पाहून त्यानें नंदयशोदेचें " तुमचे दृष्टीस हा ' बाळ ' दिसत । परी कृतांतासी शिक्षा करीत " । व गोपगोपींचें " अक्रूर बोले न लागतां क्षण । कंसासि मारील श्रीकृष्ण " । अशा रितीनें कसेबसें समाधान करून तो कृष्णबळीरामांस घेऊन निघाला. श्रीकृष्णानींही " येईन लौकरी म्हणूनि " त्या सर्वांचें समाधान केलें; पण कांहीं केलें तरी गोपिकांसारख्या अव्याज व उत्कटप्रेमी व्रजांगनांचा शोक कमी होणें अशक्यच होतें. तेव्हां " रथ घडघडा समिरगती " च नेणें भाग होतें व त्याप्रमाणें तो त्यानीं नेलाही. कारण कृष्णप्रभु गोपींच्या अव्याज प्रेमांत कितीही गुंगले तरी त्यांत स्वकर्तव्याची विस्मृति होणारे ते तुम्हां आम्हांसारखे मानव नव्हते. आणि ज्या प्रेमाच्या गुंगींत कर्तव्याची--अवतारकार्याची--विस्मृति होते तें प्रेम नसून ती अफूची गुंगी आहे असेंच म्हटलें पाहिजे! खरें सात्विक प्रेम कर्तव्याच्या आड न येतां त्यास उलट उत्तेजनच देत असतें. आकाशींच्या चंद्राकडे व त्याच्या प्रेमी तारकांकडे पहा! तारकांच्या छबकड्या नाचांत दंग झालेल्या सुधांशूला आपल्या कर्तव्याची कधीं विस्मृति पडली आहे काय ? तारकांच्या सात्विक प्रेमाचें अमृतपान करून अमृतनिधि सुधांशु अधिकच उल्हासानें आपलें कर्तव्य करीत असतो. त्या तारकांसही लाजविणाऱ्या गोपींच्या रासक्रीडेंत दंग झालेला आमचा कृष्णही सुधांशूपेक्षांही कांकणभर जास्तच कर्तव्यरत होता. आपल्या विलापानें पाषाणासही पाझर फोडणाऱ्या गोपींना, कर्तव्याची वेळ आल्याबरोबर क्षणार्धांत बाजूस सारून-त्यांच्या प्रेमाचा पाश तटकन् तोडून–प्रभु निघाले. यावरून प्रसंगीं " वज्रादपि

कठोराणि " अशी " लोकोत्तराणां चेतांसि " कशी बनत असतात हें चांगलेंच दिसून येतें. असो.

याप्रमाण श्रीकृष्णप्रभूची स्वारी आपलें मुख्य अवतारकार्य करण्यासाठीं निघाली. वाटेनें जातांना अक्रुराच्या मनांतील धाकधुकीचा शेवटचा धागाही तोडून टाकण्याकरितां प्रभूनीं एक कौतुक केलें! कृष्णबळरामास रथावर ठेवून अक्रूर यमुनेवर स्नानास गेला व तींत बुडी मारली तों पाण्यांतही त्याला कृष्णबळराम दिसले! आश्चर्यचकित होऊन अक्रूर पुन्हां रथाकडे पाहतो तों ते रथावर बसलेले! आपणास भ्रम तर झाला नाहींना, म्हणून त्यानें पुन्हां पाण्यांत बुडी मारली तों पुन्हां ते दोघे पाण्यांत। कृष्णप्रभूच्या ह्या लीला म्हणजे त्यांच्या हातचा नुसता मळ होता. अक्रुराची मात्र तो चमत्कार पाहून ईश्वराच्या सर्वव्यापीपणाबद्दल खात्री पटली व सर्व भीति लयास जाऊन तो आनंदानें पुन्हां रथावर येऊन बसला. " सोडोनीयां घोडीं चालला तांतडी। दिली असे बुडी जळामध्यें ॥ दावोनी कौतुक निरसी त्याचा धाक " ह्या नामदेवांच्या ओळींत ह्याच चमत्काराचा उल्लेख आहे. असो.

ह्याप्रमाणें चमत्कार दाखवून अक्रुरास निर्धास्त करून कृष्णप्रभूची ती श्यामसुंदर मूर्ति आपल्या तेजाची प्रभा फांकीत मथुरेस येऊन ठेपली. कृष्णबलराम रथाखालीं उतरले व एका बाहेरच्या बागेंत उतरून यमुनेवर स्नान करून बरोबर आणलेल्या भाकऱ्या खाऊन दोघेही मथुरानगरी पाहण्यास बाहेर पडले. एका रंगाऱ्याकडून वस्त्रें, माळ्याकडून हार, व कुब्जा दासीकडून गंध मिळवून त्यांहींकरून आपली काया वस्त्र, माल्य व गंध यांनीं सजवून प्रभूची स्वारी शस्त्रागाराकडे वळली. कृष्णप्रभूची ती सुनील अंगकांति–गगनोदराशीं स्पर्धा करणारी ती सुनील प्रभा-पाहून कोण सत्वस्थ जीव वेडावून जाणार नाहीं ? " पाहोनीया मुख झाले समाधिस्थ। ऋषि मुनि समस्त वेडावले. " असा तो प्रभु प्रेक्षागारांत जाऊन ज्या धनुष्याचा यज्ञ करावयाचा होता तें कसें काय आहे म्हणून पाहण्यास घेऊन त्यानीं तें सहज वांकविल्याबरोबर काडकन् मोडून पडलें–अथवा पाडलें म्हणा. त्याबरोबर शस्त्रागाराचे रक्षक आश्चर्यचकित व कांहींसे भयभीत होऊन ती बातमी सांगण्यास कंसाकडे धांवले. तों इकडे याप्रमाणें पराक्रम गाजवून प्रभु बारा वाजण्याचे–मध्यान्हीचे सुमारास प्रेक्षागाराकडे वळले व रंगद्वाराशीं येऊन ठेपले. तोंच पूर्वीं योजून ठेवल्याप्रमाणें ' कुवलयापीड ' नांवाचा हत्ती त्याच्या माहुतानें प्रभूंवर घातला. अशा रितीनें कृष्णास दाराशींच ठार मारण्याचा त्या ' कृष्ण ' हृदयी कंसाचा बेत होता. त्या वेळचा तो

बहारीचा प्रसंग-तें सुंदर वर्णन-आपण नामदेवांच्याच तोंडून ऐकूं:-" मदोमन्त हस्ती देखोनिया हांसे । पितांबर कांसे खोवियेला ॥ सावरोनि हातें केंसा देत गांठ । खोवीतसे नीट वैजयंति ॥ खांबा टेकोनिचा राहे पुढें उभा । सांवळी ही प्रभा अंगकांती ! " किती हें सुंदर ध्यान! पण त्या दुष्ट कंसाला त्याचें कांहीं आहे का ? " दुष्ट पापी हत्ती घाली अंगावरी । क्षणार्धेंचि मारी गजालागीं ॥ उपडोनिया दांत घेतसे श्रीधर । जाहला उद्धार कुवलयाचा ॥ " याप्रमाणें दाराशींच अंगावर घातलेल्या हत्तीला मुक्ति देऊन " नामा म्हणे पुढें चालिला गोविंद । सावध सावध परीक्षिती " आतां यापुढील झगडा पाहण्यास परीक्षितीप्रमाणेंच वाचकांनींही सावध व्हावें असें आम्ही त्यांस विनवितों.

कंसानें कृष्णहननाच्या इच्छेनें त्या भव्य व शोभिवंत मंडपांत शेवटची तयारी तर खूप जोरांत केलेली होती. मध्यभागीं असणाऱ्या कुस्तीच्या आखाड्यांत नियुद्धा-मध्यें-प्राणघातक कुस्तींत-कृष्णास ठार मारण्यासाटीं मोठमोठे मी मी म्हणणारे व त्याच्या पापी अन्नावर पोसलेले बोकडासारखे ' चाणूर ' ' मुष्टिक ' ' तोशल ' इत्यादि मल्ल त्यानें गोळा केले होते. त्या धनुर्यागाच्या सभामंडपांतील आखाड्यानजीक हत्तीसारखे झुलत बैठका मारणाऱ्या त्या पेहेलवानांनीं जेव्हां आमची श्रीकृष्णबळ-रामांची -त्या लहानग्या पोरांची--दुकल पाहिली तेव्हां तर त्यांना हर्षवायूच व्हायची वेळ आली." ह्या पोरांना आपण तेव्हांच चिरडून टाकूं " ह्या भावनेनें फुगलेले ते मल्ल आनंदानें नाचूं लागण्यापर्यंत वेळ आली. श्रीकृष्णाला पाहून तर त्यांतल्यात्यांत त्यांच्या फारच बडबडी सुरू झाल्या. " कृष्णातें देखोनी वल्गना करिती । चोळिताति माती दंडालागीं " अशी त्यांची मोरे दंगल उडाली. पण बिचाऱ्यांना काय ठाऊक कीं पुष्कळदां दिसतें तसें नसतें. त्या दोन चिमकुल्या देहांत केवढ्या प्रचंड शक्ती वास करीत आहेत याची बिचाऱ्यांना काय कल्पना ? ज्या शेषानें नुसतें मस्तक हलविल्या-बरोबर त्याच्या मस्तकावरील पृथ्वी थरथर कांपूं लागते व धरणीकंप होतात त्याच शेषाचा अवतार आज बळरामरूपानें आपणांसमोर उभा आहे व अखिल ब्रह्मांडाचें चक्र जो सहज लीलेनें खेळवितो तो साक्षात् शेषशायी भगवान् कृष्णरूपानें आपणांशीं आज लढाईला आला आहे हें त्या पामरांना कसें कळावें? कंसानें तावडतोब चाणुरास कृष्णाबरोबर व मुष्टिकास बलरामाबरोबर त्या प्रशस्त आखाड्यांत भिडण्याची व झुंजण्याची-आणि झुंजतां झुंजतां पूर्वीच सांगून ठेवल्याप्रमाणें ठार मारण्याची-आज्ञा केली. अरेरे! खुळा बिचारा कंस! नामदेव त्याच्या खुळेपणाचें वर्णन करतातः-

" चौदा भुवनें वसती जयांचिये पोटीं । त्यासी आणी जेठी मारावया ॥ इंद्रादि सुरवर जयाचे किंकर । त्याशीं आणी पामर झोंबीसाठीं ॥ " पण त्याचा परिणाम जो व्हायचा तोच झाला. मल्ल स मल्ल भिडल्याबरोबर चाणुरासारख्या त्या बड्या धेंडाचें सुद्धां अठरा वर्षांच्या त्या पोरानीं–कृष्णप्रभूनीं क्षणार्धात् चूर्ण केलें. तोंच कंसाज्ञेनें तोशल नांवाचा दुसरा प्रचंड मल्ल कृष्णाशीं भिडला. इतक्यांत बळरामानें आखाड्याच्या दुसऱ्या भागांत मुष्टिकाला चांगलेच मुष्टिमोदक चारून त्यास यमसदनीं पाठविलें. तेव्हां कृष्णानेंही मग वेळ न लावतां हां हां म्हणतां त्या पर्वतप्राय तोशलास धाडदिशी जमिनीवर आदळला व ठार केला. आपणास ठार मारण्यासाठीं एकामागून एक प्रचंड शक्ती अंगावर फेंकणाऱ्या कंसाचा प्रभूस भयंकर राग आला. कृष्णबलरामांच्या तेजस्वी पराक्रमाच्या अग्नींत याप्रमाणें सर्व कीटक जळून खाक झाल्यावर " नामा म्हणे एक उरलासे कंस । " पण त्याचींही शंभर वर्षे आतां पुरीं भरलीं होतीं ! कारण क्रोधानें खवळून गेलेल्या कृष्णांनीं त्याच रागाच्या सपाट्यांत चित्त्यासारखी कंसाच्या सिंहासनाजवळ उडी घेतली! प्रचंड सिंहनाद करून व दंड थोपटून प्रभु आखाड्यांतून केव्हां उडाले व त्या सिंहासनाजवळ जाऊन केव्हां उभे राहिले हें कोणास दिसलेंसुद्धां नाहीं ! श्रीकृष्णाचा तो नारसिंह अवतार पाहून कंसाची गाळणच उडाली–हात पाय लटपटूं लागले, अंगाला दरदरून घाम सुटला, डोकीचा मुकुट मातींत पडला.--जणों कंसानें आपल्या मृत्यूचें प्रस्थानच ठेविलें ! वाघापुढें मेंढरूं किंवा सर्पापुढें बेडूक ठेवल्याप्रमाणें कंसाची हृदयक्रियासुद्धां बंद पडण्याची वेळ आली व कृष्णप्रभूच्या एकाच हिसक्याबरोबर तेंही काम झालें. " दुष्टा ! " कंसाच्या मोकळ्या केंसांस हात घालून त्याला सिंहासनावरून रंगांत ओढीत प्रभु म्हणतात " भोग आतां आपल्या पापांचीं फळें ! " प्रभूच्या ओढण्याच्या व जमिनीवर आपटण्याच्या त्या नुसत्या हदऱ्यानेंच इतका वेळ शौर्याचा आव चेहऱ्यावर दाखवून बडबड करीत सिंहासनावर बसलेल्या कंसाचा जीव निघून गेला! नामदेवकृत वर्णन थोडें निराळें आहे:–" त्वरें जावोनिया धरियेला केशीं । पाडिला भूमीसी दुष्ट-बुद्धी ॥ वज्रप्राय मुष्टी वोपी नारायण । सोडियेला प्राण कंसें तेव्हां ॥ " प्रत्यक्ष परमेश्वराची वज्रमुष्टी ती! सर्व ब्रह्मांडाचा चूर ज्या मुष्टीनें व्हायचा त्यापुढें कंसासारख्या घुंगुरट्याची काय कथा ? कंसवधाबरोबर कृष्णाच्या अंगावर धांवणाऱ्या सुनाम्यास-कंसाच्या भावास-बळरामानें मधेंच ठार केलें. याप्रमाणें " पापाचा अचळु " फिटला. कंस व याचे अनुयायी ठार झाले! त्या वेळेस सर्व विश्वाला झालेल्या आनंदाचें व जयजय-

काराचें वर्णन नामदेव करतात " देव वर्षताती सुमनांचे भार । भक्त जयजयकार गर्जताती ॥ ''''''नामा म्हणे पुढें अप्सरा नाचती । वर्णिताती कीर्ति कृष्णजीची । "
केवढा तो रम्य प्रसंग! " विनाशाय च दुष्कृतां " अवतरलेल्या प्रभूचें असें अभिनंदन व्हावें हें साहजीकच आहे. अशा रितीनें मोठ्या आपत्तींतून व संकटांतून-कंसाच्या घोर जाचांतून व त्रासांतून सुटल्यामुळें सर्व जगाला हायसें झालें-आनंद वाटला! कंसाचा बाप-उग्रसेन-बंदींत होता त्यास मुक्त करून प्रभूनीं त्यास पुन्हां मथुरेच्या सिंहासनावर बसविलें व सर्व राज्याचा बंदोबस्त लावून दिला.

कंसहननार्थ प्रभू मथुरेस आल्यावर मागें नंदयशोदा व गोकुळांतील कांहीं उत्कट कृष्णप्रेमी स्त्रीपुरुष यांना गोकुळांत करमणें शक्यच नव्हतें; म्हणून तींहीं मथुरेस यावयास निघालीं व बरोबर कंसवधाच्या वेळेस मथुरेस येऊन पोंचलीं. वसुदेवदेवकी बंदींतून मागेंच मुक्त होऊन त्याच वाड्यांत रहात होतीं. कृष्णांनीं आपल्या जन्मदात्या मातापित्यांच्या पायांवर मस्तक ठेवलें व अठरा वर्षांनीं पुन्हां झालेल्या दर्शनाच्या दिव्य आनंदाच्या आलिंगनाचें वात्सल्यसुख आपल्या मातेस व पित्यास दिलें. ज्या वाड्यांत आपला जन्म झाला ' तो वाडा ' सगळीकडे हिंडून पाहिल्याशिवायही प्रभूस रहावेना! याप्रमाणें सर्वांच्या भेटी व आनंद होऊन चार दिवस झाल्यावर नंदयशोदा व वसुदेवदेवकी यांनीं कृष्णबलरामांच्या मौंजिबंधनाचा विचार करून गर्गमुनीस-त्यांच्या कुलोपाध्यायास ( यांनींच कृष्णाचें जातक वर्तविलें होतें )-बोलावून व चांगलासा मुहूर्त पाहून मौंजिबंधनविधि थाटानें पार पाडला व नंतर सांदीपनी गुरूकडे उज्जनीस कृष्णबलराम विद्या शिकण्यास राहिले. त्यांच्या बरोबर सुदामाही होता. लहानपणच्या मैत्रीचा निर्भेळ आनंद तो! त्याचें कोठवर वर्णन करावें? त्या आनंदाच्या भरांत त्यांच्या अखंड मैत्रीच्या कित्येकदां आणाभाका झाल्या व त्या आमच्या कृष्ण प्रभूनें पाळल्याही. त्याची हकीकत पुढें येईलच. त्या आधीं आपण त्यांच्या अध्ययनांतच सध्यां रंगूं. सांदीपनीसारखे गुरु व कृष्णबलिरामासारखे कुशाग्रबुद्धीचे विद्यार्थी! मग विद्या सपाट्यानें व हां हां म्हणतां पुरी व्हावी यांत कांहींच नवल नाहीं. किंबहुना " चौसष्ठ दिवसांत सर्व वेद व नंतर संग्रहसहित धनुर्वेद पठण " करणाऱ्या त्या मुलांची-रामकृष्णांची कुशाग्र बुद्धि पाहून सांदीपनीस त्यांच्या प्रभुत्वाची खूण पटली व आपली सर्व विद्या मोठ्या आदरानें त्यांनीं त्यांना दिला. सांदीपनीचा आपल्या शिष्यास हाच बोध होता कीं, होतां होई तों " कर्मीं वसा, नसो परमर्मी लोचन, असा दया धर्मी ।

नर्मादि मृषोक्ति न यो, शर्मा नांदा, शिरा क्षमावर्मा ॥ " गुरूचें आपल्या शिष्यांवर पुत्रापेक्षांहि अधिक प्रेम होतें. कृष्णबळरामांच्या पूर्णावताराची गुरुजीस जाणीव होती. असो. याप्रमाणें अवघ्या सहा महिन्यांत अध्ययन पुरें झालें व गुरुदक्षिणा देण्याची वेळ आली. सांदीपनीसारखा निस्पृह योगी काय मागणार ? पण कृष्णाचा फारच आग्रह पाहून त्याच्या भार्येनें आपला मृतपुत्र आपणास परत मिळावा असें मागितलें. ताब-डतोब कृष्णांनीं यमलोकीं जाऊन त्यास परत आणला. त्याचें वर्णन ज्ञानेश्वरमुखानें प्रभू आपण होऊनच अर्जुनास सांगतात " मृत गुरुपुत्र आणिला । तो तुवांचि पवाडा देखिला ! " असो. याप्रमाणें गुरुगृहीं अध्ययन संपवून रामकृष्णांच्या स्वाऱ्या परत मथुरेस आल्या तेव्हां त्यांच्या विरहानें व्याकूळ झालेल्या त्यांच्या मातापित्यांनीं व सर्व पौरजनांनीं गुढ्या तोरणें उभारून त्यांचें मोठे थाटांत स्वागत केलें.

याप्रमाणें कांहीं काळ स्वस्थतेंत जातो न जातो तोंच रामकृष्णांच्या धनुर्विद्येची परीक्षा होण्याची–ती विद्या कसोटीस लागण्याची वेळ लवकरच येऊन ठेपली. कारण कंस हा त्यावेळीं सर्व भरतखंडांत सम्राटपद पावलेल्या दुष्ट जरासंधाचा जांवई होता. यानेंच शंभर राजे बंदींत घालून त्यांचा ' नरमेध ' करण्याचा दुष्ट विचार केला होता व शेवटीं ह्यास श्रीकृष्णांनीं युक्तीनें भीमाकडून कसा पुढें ठार केला–जरेनें जसा सांधला तशाच त्याच्या चिरफळ्या कशा उडवल्या हें आपण महाभारतांत पाहिलेंच आहे. तेव्हां अशा ह्या प्रबलप्रतापी पण तितक्याच दुष्ट सम्राटाच्या --मगधाधिपती जरासंधाच्या दोन मुली कंसास दिलेल्या होत्या. त्यांनीं–त्या कंस स्त्रियांनीं—आपल्या लाजिरवाण्या जिण्याची कहाणी आपल्या बापाजवळ सांगून आपल्या दुःखी निश्वासाच्या वाऱ्यानें त्याचा कोपानल भडकविला, त्यांत आपल्या अश्रूंचें घृत घातलें व त्यास मथुरेवर धाडून दिले. पोरींच्या विलापानें खवळलेला दुरात्मा जरासंध ज्यांनीं त्यांचें ' कपाळ ' फोडले त्या कृष्णाचा सूड घेण्यासाठीं म्हणून मिळाली तितकी सेना घेऊन मगधदेशाहून तडक निघाला व सपाट्यासरशी त्यानें मथुरेस वेढा घालून नाकेबंदी केली. मथुरेंतील शूर यादव-वीरांनींही शस्त्रास्त्रांच्या जोरावर सत्तावीस दिवस मथुरा लढवली. तरीसुद्धां वेढा उठण्याचें चिन्ह दिसेना. तेव्हां अठ्ठाविसाव्या दिवशीं बळराम व कृष्ण हे अनुक्रमें दक्षिण व पश्चिम द्वारानें बाहेर पडून त्यांनीं भयंकर पराक्रम करून शत्रूचें सैन्य उधळून लावलें व ते विजयी वीर परत आले. दुसऱ्याच दिवशीं वेढा उठवून जरासंध परत गेला व सर्वांनीं आमच्या दिव्य पराक्रमी वीरांचें–रामकृष्णांचें अभिनंदन केलें !

पण जरासंध परत गेला तो केवळ दुप्पट जोराच्या तयारीनें परत येण्याकरितांच होय. परत गेलेल्या त्याच्या सैन्याची लाट अधिक पाण्यासकट दुप्पट जोरानें पुन्हां मथुरेच्या किनाऱ्यावर येऊन आदळणार होती. वेढा उठल्यानें झालेली शांतता ही खरी शांतता नसून केवळ वादळापूर्वीची नितांत शांतता होती. मथुरेंतील सर्व लोक ही गोष्ट जाणून होते व भावी संकटास तोंड देण्यासाठीं त्यांनींही आपल्याकडून शक्य ती तयारी व बंदोबस्त चालविलाही होता. इतक्यांत लवकरच–पूर्वीच भाकित केल्याप्रमाणें जरासंधाच्या अफाट सेनेच्या खवळलेल्या सागराच्या लाटा मथुरेवर येऊन आदळल्याच. इतक्या मोठ्या प्रचंड सैन्याशीं टक्कर देणें यादवांच्या मगदुराच्या बाहेरची गोष्ट होती. रामकृष्णांचा अद्भुत पराक्रम इतक्यासही पुरून उरला असता; परंतु आपल्यासाठीं मथुरेंतील लोकांस अधिक त्रास नको म्हणून यादवसभेंतील एका वृद्ध मंत्र्याच्या सल्ल्याप्रमाणें त्यांनीं ताबडतोब मथुरा त्याच दिवशीं सोडली व दक्षिणापथानें मार्ग आक्रमीत वेणानदीच्या कांठच्या करवीरग्रामीं परशुरामाची–तेजःपुंजकाय व दुष्टक्षत्रियनिर्दालक अशा भार्गवरामाची–गांठ घेऊन त्यांच्या सल्ल्यानें खट्वांगनदीचा धबधबा पाहून शेवटीं क्रौंचपुरावरून गोमंतपर्वतावर ते येऊन राहिले! इकडे ' पक्षी ' याप्रमाणें ' पळाले ' असें जरासंधादि फांसेपारध्यांस कळल्याबरोबर त्यांनीं आपल्या अफाट व अथांग सेनेचें–चतुरंगदलाचें–जाळें गुंडाळलें व कृष्णबलराम जिकडे पळाले होते तिकडे जाऊन पुन्हां त्यांनीं आपलें जाळें पसरलें. त्यांच्यांतच शिशुपाल होता. महाभारतांत राजसूय यज्ञाचे वेळीं ह्या दुष्ट आतेभावाचे शंभर अपराध पुरे भरल्यावर श्रीकृष्णांनीं आपल्या सुदर्शनचक्रानें त्याचें मस्तक कसें धडापासून वेगळें केलें तें आपण वाचलेंच आहे. पण ती कथा पुढची आहे. सध्यां आमच्या शिशुपालाचें अपराधांचें माप चालू होतें. ह्या दुष्टानें म्हटल्याप्रमाणें व परशुरामानीं सांगितल्याप्रमाणें जरासंधाच्या सैन्यांतील राजे खरोखरच ' नाजुक ' होते. डोंगरी लढाया त्यांना ठाऊक नव्हत्या. तेव्हां शिशुपालाच्या साह्यानें त्या गोमंत पर्वतास चारी बाजूंनीं आग लावण्यांत आली. दोन दिवस जळणाऱ्या त्या वणव्यांत हजारों गरीब व हिंसक जीवांचा संहार झाला. पण आमच्या कृष्णप्रभूस व बलरामदादांस त्यानें काय होणार ? ते ताबडतोब पर्वतावरून उड्या टाकून खालीं आले व मग मात्र खवळलेल्या त्या दोन वीरांनीं त्या लाखों सैनिकांस नुसते धुळीचे दिवे चारले. एकाच आचमनांत समुद्र गट्ट करणाऱ्या अगस्तीप्रमाणें त्या दोघांच्या एकाकी पराक्रमांत हजारों योध्यांच्या आहुती पडल्या. उदया-

द्वीवर दिनकर आल्यावर लाखों नक्षत्रांचा जसा लोप होतो तशी स्थिति झाली. नांगरानें ओढून मुसळानें टाळकें सडकणाऱ्या व सुदर्शनचक्रानें कित्येकांची मुंडकीं एकाच सपाट्यांत उडवणाऱ्या त्या वीरद्वयापुढें कोणचा योद्धा किंवा कोणचें सैन्य टिकेल? ज्याप्रमाणें "चतुर्दशसहस्राणि रक्षसां भीमकर्मणां। हतान्येकेन रामेण मानुषेण पदातिना" असें रामप्रभूचें मार्मिक शौर्यवर्णन रामायणांत आहे त्याचप्रमाणें इथेंही स्थिति झाली. असो. याप्रमाणें त्यांची दाणादाण उडवून वाटेंत करवीरचा दुष्ट 'कोल्हा'—शृगालराजा अंगावर आपण होऊन चालून आला तेव्हां त्याचा सुदर्शनचक्रानें समाचार घेऊन--त्यास ठार मारून आमचे प्रभु भगवान् आपल्या वडील भावासह मोठ्या थाटानें मथुरेस परत आले. मल्लविद्येप्रमाणेंच धनुर्विद्येंतही अलौकिक लौकिक मिळविलेल्या त्या वीरांचें स्वागत मथुरेंत केवढ्या उत्साहानें व आनंदानें झालें असेल याची वाचकांनींच कल्पना करावी !

यानंतर कृष्णप्रभूचीं दोन तीन वर्षें मथुरेस सुखांत गेलीं. सर्व आप्तेष्टांची ओळख याच वेळीं त्यांनीं करून घेतली. पंडूच्या मरणानें हिमालयांतून हस्तिनापुरास भीष्मांच्या आश्रयास आपल्या पोरक्या पोरांना--धर्मादि अर्भक पांडवांना घेऊन येऊन राहिलेली कुंती आपली आत्या आहे--वसुदेवाची वहीण आहे--हें कळल्यावर त्यांच्या समाचारास व धृतराष्ट्रादिकांस त्यांच्या योग्य परिपालनाचा उपदेश करण्यास प्रभूनीं अक्रुराची रवानगी केली. त्यानंतर लवकरच कुंडिनपुरास भीष्मकानें आपल्या पोरीचा-रुक्मिणीचा स्वयंवर मांडला आहे व जरासंध, दंतवक्र, शिशुपाल, क्रथकौशिक इत्यादि राजे तेथें जमले आहेत असें त्यांस कळल्यावर प्रभुही तेथें गेले. पण त्यांच्या पराक्रमाच्या धास्तीनीं हाय खाल्लेल्या त्या शेंदाडशिपायांनीं "तो राजा नाहीं" हीच सबब पुढें आणली! तावडतोब उदारमनस्क क्रथकैशिकानें आपलें राज्य कृष्णास अर्पण करून त्याच्या मस्तकावर आपला मुकुट ठेविला. खुद्द भीष्मकानेंही त्या राज्याभिषेकसमारंभास हजर राहून कृष्णाचा गौरव केला. पण जरासंधादि दुष्टांस हें कसें खपावें? वास्तविक या वेळीं खरें पाहतां स्वयंवरही व्हावा. पण आपल्या मनाजोगतें होत नाहीं व तसें करण्याची धमकही अंगांत नाहीं असें पाहिल्यावर सभाच उधळून लावण्याचा किंवा तींतून निघून जाऊन ती बंद पाडण्याचा प्रयत्न करणाऱ्या शेंदाडशिपायांप्रमाणें जरासंधादि वीर तावातावानें आपल्या देशास निघून गेले! व याप्रमाणें हा स्वयंवर राहिला.

पण जिथें तिथें हा कारटा—हा गवळ्याचा पोर-मला आड येतो—मी एवढा हिंदुस्तानचा सम्राट असून माझा व माझ्या पक्षाचा हा कृष्ण जिथें तिथें पाणउतारा करतो हें शल्य जरासंधाच्या मनांतून गेलें नाहीं व परक्या कालयवनास मदतीस बोलावून पश्चिमेकडून कालयवनानें व पूर्वेकडून जरासंधानें मथुरेवर हल्ला चढवून दोघांच्या कात्रींत मथुरेचे व कृष्णाचे तुकडे उडवावेत असा त्या दुष्टानें प्रचंड बेत रचला व तो प्रत्यक्ष अमलांतही आणण्याचा घाट घालून तो मथुरेकडे येण्यासही निघाला. जरासंध आपणास अवध्य आहे तसाच कालयवनही अवध्य आहे हें श्रीकृष्ण जाणून होते व म्हणून त्यांचा काटा युक्तीनेंच उपटला पाहिजे असें त्यांनीं ठरवलें. यद्यपि त्यांच्या सैन्यांचा फडशा पाडण्यास ते पूर्ण समर्थ होते व त्याप्रमाणें आजवर त्यांनीं दोन तीनदां त्यांना माती चारलीही होती, तथापि केवळ आपल्यासाठीं एखाद्या ' प्लेग ' सारखा हा कायमचा ' प्लेग ' च—त्रासच--मथुरेस होऊन बसणार व ज्या रस्त्यावर आपल्यासाठीं गुलाल उधळला गेला तेथेंच निष्कारण रक्ताच्या चिळकांड्या उडणार हा विचार मनांत येऊन प्रभूंनीं सर्व यादवांस सांगून ताबडतोब सर्वांनीं आपलें ठाणें तेथून हालवलें व पश्चिमेकडे आनर्त देशाजवळ समुद्राचे कांठीं कुशस्थळीं ह्या रम्य प्रदेशांत त्यांनीं द्वारकेची वसाहत केली. कालयवन पश्चिमेकडून चालून येत होता त्यास वाटेंतच गांठावा म्हणून कृष्णप्रभु घाईघाईनें निघाले व धोलपुराजवळ त्यास गांठून धोलपूरच्या डोंगरांत त्यास घेऊन जाऊन तेथें एका गुहेंत निजलेल्या मुचकुंद राजर्षीकडून त्याचा वध करविला. झोपेंतून जागे करणाराकडे पहातांच तो जागा करणारा भस्म व्हावा असा देवासाठीं लढून थकून निजलेल्या त्या राजास देवांचा वर होता. कृष्ण त्याच गुहेंत लपल्यावर कालयवन तेथें आला व निजलेला मुचकुंद कृष्णच आहे असें समजून त्यास त्यानें लत्ताप्रहर केला. त्याबरोबर मुचकुंदांनीं डोळे उघडले व कालयवनाकडे पाहिलें--कालयवन भस्म झाला!

कालयवन मेला व कृष्णही यादवांसकट द्वारकेस जाऊन राहिला; मग आतां मथुरेवर स्वारी करण्यांत काय अर्थ आहे? असें पाहून आमचे जरासंधमहाराजही परत मगध देशास गेले!

कालयवनास मारून परत आलेल्या श्रीकृष्णानीं द्वारकेची अत्यंत रम्य मांडणी करून तिला प्रतिअमरावती-इंद्राची राजधानी-बनवून आमचा ' द्वारकेचा राणा ' तेथें राहूं लागला. पण ऐन पंचविशीच्या घरांत असलेल्या व सर्व प्रकारच्या कीर्तीनें

शोभणाऱ्या आमच्या राण्यास अद्याप ' राणी ' मिळाली नव्हती. त्याचा तो उत्तुंग प्रासाद अद्याप गृहिणीवांचून सुनाच होता. वसुदेवास कृष्णानें सुना मिळवून दिल्या-शिवाय तो प्रासादही सुनाच रहावा हें योग्यच आहे. पण "भोगाः के रमणीं विना ? " किंवा " गृहं तु गृहिणीहीनं कांतारादतिरिच्यते " ह्या प्रसिद्ध वचनांप्रमाणें ह्या सर्व वैभवावर गृहस्थाश्रमाचा लखलखीत कळस चढविल्यावांचून–रमणीचा सौभाग्य-कुंकुमतिलक त्यास लाविल्यावांचून त्यास मार्दव, सौंदर्य व पूर्णता येणार नव्हती. श्रीकृष्णानीं त्या मार्दवाची व सौंदर्याची प्राप्ति कशी करून घेतली हें जाणण्यास आमचे प्रिय वाचक आतां साहजीकच उतावळे झाले असतील, तर त्यांना आतां रुक्मिणीच्या रम्य विवाहकथेकडेच घेऊन जाऊं म्हणजे झालें.



# भाग पांचवा



पण वाचक ! रुक्मिणीच्या रम्य विवाहकथानकाकडे वळण्यापूर्वी ज्या " गोकुळ-वासी जनांचा " प्रभूला व आपणांस कधींच विसर पडणार नाहीं त्यांच्या स्थितीचें-कृष्णाच्या पश्चात् त्याच्या विरहानें झालेल्या त्यांच्या दुखःद स्थितीचें करुणचित्र प्रभूनीं धाडलेल्या उद्धवाबरोबर जाऊन आपणांस क्षणभर पहावयास नको काय? चला तर वाचक, आपण क्षणभर त्याच करुणसुखद दृश्यांत रंगूं या. त्या " गोकुळ-वासी जनां " चें प्रेम आपल्या ठिकाणीं कसें अपरिमित होतें व त्यामुळें त्यांची कशी शोकजनक अवस्था झाली असेल याचें वर्णन प्रभु मध्वमुनींच्या तोंडून " उद्धवा शांत-वन कर जा " ह्या अत्यंत करुणरसपूर्ण पद्यांत करतातः-" उद्धवा शांतवन कर जा त्या गोकुळवासी जनांचें ।। " बाळा उद्धवा ! माझ्यावांचून ढळढळा रडत असणाऱ्या त्या गोकुळवासी जनांचें जाऊन तूं कसेंवसें सांत्वन कर बरें ! उद्धवा ! अरे काय सांगूं तुला ? " वा नंद यशोदा माता मजसाठीं त्यजतिल प्राण ! । त्यागूनि प्रपंचा फिरती मनि उदास रानोरान ।। " माझ्या वियोगदुःखानें रानींवनीं भटकणारा माझा नंद बाप व यशोदा माता हीं जीवसुद्धां देतील बरें ! उद्धवा ! माझ्या वियोगानें तळमळणारे माझे मायबाप-हाय ! त्यांची स्थिति आतां कशी असेल ? " अन्नपाणि त्यजिलें रडती अति दुःखित झाले दीन " उद्धवा ! माझ्या जन्मापासून त्यांनीं किती कष्ट सोसले व किती खस्ता खाल्या बरं ! "जन्मलो तैंहुनी झटले । मजलागीं तिळतिळ तुटले । कटि-खांदिं वाहता घटले । आटलें रक्त देहाचें ।। १ ।। " अरेरे ! उद्धवा ! ही स्थिति केवळ माझ्या मातापितरांचीच होती काय ? नाहीं बरें. " आइबाप त्यजूनी बाळें मज संगे खेळत होतीं । गोडशा शिदोऱ्या आणुनी आवडिनें मजला देती । रात्रंदिस फिरले मागें दधिगोरस चोरूं येती । " अहाहा ! आईबापांचा त्याग करून माझ्या प्रेमानें भुललेल्या त्या बाळांना टाकून मला इकडे यावें लागलें ना ! अरेरे ! उद्धवा ! ही गोष्ट माझ्या जिवास कशी लागून राहिली आहेरे. हायहाय ! माझ्यावांचून आतां त्यांचें कसें होत असेल ? मी कोठें क्षणैक दृष्टीआड झालों कीं " कृष्णा ! कृष्णा ! " म्हणून टाहो फोडणारीं तीं बालकें आतां आपले दिवस कसे कंठीत असतील-कुणा-च्या तोंडाकडे पहात असतील ? " मी तोडुनि आलों तटका । तो जिवासि लागला

चटका। मजविण त्या युगसम घटिका। आठवतें प्रेम जयांचें ॥ २ ॥ " उद्धवा! त्यांचें तें अलोट प्रेम आठवलें म्हणजे अजूनही मला कसें भडभडून येतें! तसेंच त्या गोपींचीहि हीच स्थिति बरें! अहाहा! माझ्या मुरलीच्या संगीतानें गुंगलेल्या गोपींनीं " बांसरी बजाव सखे बांसरी बजावोरे! " " बजाव बजाव मुरली । कन्हया बजाव बजाव मुरली । " अशी माझी कितीदां तरी प्रार्थना करावी. माझ्या दिव्य लावण्याचें पान करतां करतां त्या गोपींची तंद्री लागावी व माझ्या प्रेमानें रंगलेल्या त्या गोपींनीं माझ्या मुरलीच्या तालावर नाचत मी म्हणेन तेव्हां माझ्याभोंवतीं गोळा व्हावें! उद्धवा! प्रेमळ गोपींना भग्नमनोरथ करून मी इकडे आलों ना? हायरे देवा! त्या निष्कपट हृदयाच्या सरल बाला एव्हांनीं मरून सुद्धां गेल्या असतील—माझ्या वियोगाच्या झुरणीनें झुरून झुरून त्यांचा केव्हांच अंतही झाला असेल. यासाठीं उद्धवा! तूं एकदां लवकर जाच; व गेल्याबरोबर " हरि आहे सुखरूप म्हणुनी भेटताचि त्यां सांगावें । सांगकीं समस्तां पुशिलें प्रत्युत्तर त्या मागावें " उद्धवा! त्या सर्वांच्या चिंतेनें माझी इकडे कशी तळमळ होत आहे—माझा जीव कसा कासावीस होत आहे व त्यांच्या आठवणीच्या दुःखानें माझी अवस्था कशी कावरीबावरी झाली आहे हें त्यांना नीट सांग बरें! वास्तविक उद्धवा! " हें कार्य नव्हें तुजजोगें । मजसाठीं जावें वेगें । " निरुपाय आहे, उद्धवा, तूं जाच. लवकर जा व तुझ्याकडून होईल तितका बोध करून त्यांच्या शोकाला बांध घाल. "

मध्वमुनींचें वरील हृदयस्पर्शी पद्य वाचून कोणाचें बरें चित्त हेलावणार नाहीं? कोणाच्या हृदयाची कालवाकालव होणार नाहीं? उद्धवाची स्वारी गोकुळास जाऊन पोंचल्याबरोबर त्यास काय दिसून आलें? " करिता दळणकांडण । माझें दीर्घस्वरें गाती गुण । कीं आदरिल्या दधिमंथन । माझें चरित्र गायन त्या करिती ॥ करिता सडासम्मार्जन । गोपिकांसि माझें ध्यान । माझेनि स्मरणें जाण । वरिये देणें बाळका ॥ ......विसरल्या त्या विषय सुखें । विसरल्या त्या द्वंद्वदुःखें । विसरल्या त्या तहानभूके । माझेनि एकें निदिध्यासें " श्रीकृष्णाचें ध्यान श्रीकृष्णाचें मनन व श्रीकृष्णाचेंच सदा चिंतन यांवांचून अवघ्या गोकुळास दुसरा विषय ठावा नव्हता! " कीं मजचि नाम जिणिया ठेविलें " अशी त्यांची स्थिति होती! विरहानलानें वाळलेले गोपगोपींचे व व्रजबालांचे देह केवळ प्रभुचिंतनावर— त्या नामामृतावर जगले होते. " किंबहुना पांडवा । आपलिया सर्व भावा । जियावया बोलावा । मीचि केला " अशी त्यांची अवस्था होती. वृक्षपाषाणांतून सुद्धां त्याच प्रभूचें दिव्य नाम निघत

होतें. यमुनाजलावर उठणारे तरंग तेंच समाधीगीत गात होते! वायुलहरीबरोबर हलणाऱ्या तृणांतून तोच दिव्यनाद स्रवत होता! हा सर्व देखावा पाहून उद्धव थक्क झाला; व यमुनेवर पाण्यास आलेल्या गोपींनीं परिवेष्टित असा तो यमुनातटाकीं बसला असतां " ह्या विदेही असून प्रभुप्रेमानें झुरणाऱ्या गोपींस मी आतां बोध तरी कसचा करूं ? ज्यांच्या भक्तिप्रेमावरून माझ्यासारखे कित्येक उद्धव ओंवाळून टाकावेत तो मी आतां ह्यांना ज्ञानाच्या गोष्टी तरी कसल्या सांगूं ? " असा त्याला साहजीक प्रश्न पडला. तथापि त्यांचें कसेंबसें समाधान करण्यासाठीं त्यानें प्रश्न केला " काय बायांनो ? ठीक आहेना ? " " हो ठीकच आहे म्हणायचें. हे देह तुम्हांस चालते बोलते दिसतात तेव्हां तुम्हीं हा प्रश्न विचारावा हें योग्यच आहे. हे देह–किंबहुना सर्व गोकुळ केव्हांच मृतप्राय झालेलें आपणास दिसलें असतें. पण उद्धवजी! त्या प्रभूच्या–त्या भुवनमोहन गोपाळाच्या अखंड चिंतनावर हें सगळें गोकुळ जगत आहे त्याला कोण काय करणार? त्या प्रभूवर प्रेम करावें, त्याचे अखंड ध्यानांत डुलत रहावें असेंच आमच्या चित्तांस वाटतें त्याला उपाय नाहीं. पण तसें जर नसतें तर ह्या विरहाग्नीच्या ज्वाला इतक्या तीव्र आहेत कीं आमच्या प्रेमाश्रूंच्या जलधारा जर त्यावर न पडत्या तर आमचे देह केव्हांच त्यांत जळून खाक झाले असते. " गोपींनीं उत्तर दिलें. उद्धव बापडा त्यावर काय बोलतो? त्यानें कसाबसा त्यांना बोध करण्याचा यत्न आरंभिला व तो ज्ञानाच्या गोष्टी सांगू लागला. पण तें शुष्क, नीरस ज्ञान त्या गोपींला कसें पटावें? " जाणे भक्तीचा जिव्हाळा । तोचि दैवाचा पुतळा ॥ आणिक नये माझ्या मना । हो का पंडित शहाणा " ह्या तुकोक्तीप्रमाणें त्यांची स्थिति होती. " ठेवा जाणीव गुंडून " असें सांगणाऱ्या त्या प्रेमळ पण अधिकारी गोपी होत्या. " आवडे ज्या हरी अंतरापासोनि । ऐसियाचे मनीं आर्त माझें " असे त्यांचे विचार होते. त्यांना उद्धव सांगूं लागला तें ज्ञान ठाऊक नव्हतें काय? पण त्या ज्ञानानंतरही असणाऱ्या दिव्यभक्तिसुखामृतांत रंगलेल्या त्या गोपींचें त्या निष्प्रेम ज्ञानानें कसें समाधान व्हावें? कृष्णविरहानें जळणाऱ्या गोपींच्या देहास त्यांनीं कशी शांति वाटावी? ज्या कन्हय्यासाठीं त्यांचा ' जीव कासावीस ' होत होता तो श्यामसुंदर जगदात्मा प्रत्यक्ष प्रगटल्यावांचून त्याच्या सर्वव्यापीपणाच्या पोकळ गप्पांनीं त्यांना कसें सुख होणार? " परि ठाकिलियाहि सागरू । जैसा मागीलही यावा अनिवारु । ते ये गंगेचिये ऐसा पडिभरु । प्रेमभावा " असें ज्यांचें उत्कट प्रेम व त्यामुळेंच ज्या " युक्ततमा " झालेल्या त्यांना कोरड्या ज्ञानाचे फांके कुठ-

धर रुचणार? शेवटीं उद्धवाच्या विनंतीवरून व गोपींच्या दिव्य प्रेमासाठीं भगवंतास त्या वाळवंटावर प्रगट व्हावें लागलें! अस्तु.

आतां आपण रुक्मिणीच्या रम्य विवाहकथेकडे वळूं. या कथेस रुक्मिणी स्वयंवर असेंही म्हणतां येईल. कारण कृष्ण प्रभूला रुक्मिणीनें स्वतः मनानें वरिलें आहे. लौकिक दृष्टीचा स्वयंवर मात्र एकदां मांडला जाऊन कसा राहिला--मोडला हें आपण मागें वाचलेंच आहे. विदर्भ देशाचा भीष्मक राजा इतर शेंकडों राजांप्रमाणेंच जरासंधाचा मांडलिक होता व त्याच्याच निमंत्रणावरून त्याला मथुरेच्या वेढ्याचे वेळींसुद्धां जाऊन त्याच्या बाजूनें लढावें लागलें आहे. त्याच्याच भीतीनें व आग्रहानें तो दमघोषाच्या शिशुपालास आपली मुलगी देण्यास तयार झाला होता. वास्तविक लहानपणापासून पुराणश्रवणांतून ज्या सांवळ्या प्रभूचीं गुणवर्णनें भीमकबाळा--रुक्मिणी ऐकत होती त्यालाच तिच्या बालहृदयानें वरावें व उत्तरोत्तर तें प्रेम दृढ व्हावें हें साहजीकच आहे. खुद्द राजाचाहि विचार कृष्णप्रभूसच तिला द्यावी असाच होता व विद्वान् ब्राम्हणांनींहि पण त्याला तशीच सल्ला दिली. वैदर्भीचें–त्या सुंदर बालेचें--प्रेम लहानपणापासूनच कृष्णावर होतें हें तीच “ कौरवयादवभार्या एका जागीं मिळोनिया बसल्या” असतां सांगत आहे. “ प्रथम म्हणे वैदर्भी, बाई! होते लहान मी कन्या। धन्या कृष्णकथा मज तेव्हांचि रुचे, न आवडे अन्या. ” पण तिच्या आधीं जन्मलेल्या आमच्या रुक्म्याला–तिच्या दादाला–त्याचें काय? आपल्या भगिनीच्या हृदयदानाचा किंवा पित्याच्या खऱ्या विचाराचा विचारहि न करतां मन मानेल तसा धिंगाणा घालणारा तो दुष्ट राक्षस होता. शिशुपाल, वक्रदंत, जरासंध, कंस यांसारख्या राक्षसांशीं त्याचें ‘समानशीलव्यसना’ मुळें ‘सख्य’ होतें. त्यांतील ‘शिशुपाल हा मोठा पराक्रमी राजा आहे व त्यालाच तिला द्यायची, त्या गवळ्टाला कोण देतो’ असा त्याचा हट्ट होता व त्याप्रमाणें त्यानें शिशुपालास आपल्या सर्व मित्रांसह व परिवारासह लग्नास येण्यास–रुक्मिणीचा स्वीकार करण्यास–पाचारण केलें होतें.

केवढा हा प्रसंग! “ बंधु विकी जरि निज भगिनीला। शरण कुणा जावें? ” ही कै. अण्णासाहेबांची उक्ति किती खरी आहे! या वेळेस रुक्मिणीनें त्या रुक्म्याची किती विनवणी केली असेल, “ भीमकबाळा म्हणे नृपाळा त्या शिशुपाळा मी न वरी ” याप्रमाणें आपल्या पित्याजवळ तिनें किती शोक केला असेल याची कल्पनाच केली पाहिजे! परंतु सज्जन हृदयाचा पण कमकुवत मनाचा तिचा पिता जरी तिचें कल्याण इच्छित होता व कृष्णासच ती मिळावी अशी जरी त्याची इच्छा होती तरी

कंसानें आपल्या बापास बंदींत घालून ज्याप्रमाणें आपला दुष्टपणा चालू ठेविला त्याचाच मित्र रुक्म्या होता हें वाचकांनीं लक्षांत ठेविलें म्हणजे त्या कर्दनकाळ पुत्रा-पुढें प्रत्यक्ष बापाचीहि डाळ कशी शिजेना हें समजून येईल. अस्तु. गरीब बिचारी राणी– रुक्मिणीची माता–तिला कोण विचारतो? जिथें राजाचेंहि कांहीं चालेना तिथें तिचा काय पाड? याप्रमाणें सगळीकडूनच आकाश फाटल्यावर व नैराश्यानें घेरल्यावर त्या दीन रुक्मिणीनें कोणाकडे वरें धांव घेतली असेल? अर्थात् त्या अनाथनाथ, भक्तवत्सल, प्रभु गोपालकृष्णावांचून दुसऱ्या कोणाकडे असणार! तिनें दऊतटांक घेतला व त्या प्रभूच्या चरणीं एक निर्वाणीची "पत्रिका" धाडली. "स्वकरें वसंत-तिलका वृत्तें पत्रांत सात मोजोनी। लिहिलीं होतीं तींही लिहितां लिहितां क्षणांत योजोनी." भयभीत प्रेमाची ही केवढी तारांबळ! ती पाहून कोणाला बरें रुक्मिणीची कींव येणार नाहीं? रुक्मिणीनें श्रीकृष्णास लिहिलें होतें–" ऐकोनिया भुवनसुंदर या गुणातें। निर्लज्ज चित्त हरि हें तुजला वरीते" "देहार्पणा करुनि तूं पति म्यां वरीला" पुन्हःपुन्हां रुक्मिणी हीच गोष्ट सांगते कीं "म्यां तूज निश्चितमनें वरिलें अनंता। येऊनिया करिं धरोनि करी स्वकांता......येऊनिया करिं धरी मज चक्रपाणी। चैद्यादि दुष्ट हरि हे न धरूत पाणी" नंतर ती प्रभूला सुचवितेः— "लग्नाचिया पहिलिया दिवसांत यावें। संगीं समग्र बल यादव-सैन्य घ्यावें। या चैद्य-मागध-बळांबुधितें मथावें! मातें निशाचर-विधी करुनी हरावें॥" त्यावर "तुझे भाऊ जर आडवे आले तर त्यांना कापून काढल्याशिवाय मला तुला कसें नेतां येईल?" अशी कृष्णाच्या तर्फे शंका घेऊन रुक्मिणी म्हणते "यांचे कुळीं हरि असे कुलदेवियात्रा। तेथूनि तूं मजसि ने." शेवटीं "जन्मा शतांत मरणें स्मरणें मुकुंदा। अंतीं तुझ्याच वरणें चरणारविंदा" अशी प्रार्थना करून "हरिचरणसरोजीं रुक्मिणीची शिराणी" ठेऊन दिली व तें पत्र सुदेव नांवाच्या ब्राह्मणाबरोबर द्वारकेस कृष्णाकडे रवाना केलें; परंतु हाय! अगदीं लग्नदिवसापर्यंत सुद्धां प्रभूची स्वारी आली नाहीं हें पाहून रुक्मिणीच्या हृदयाची किती घालमेल झाली असेल याची वाचकांनींच कल्पना करावी. त्या वेळच्या आपल्या स्थितीचें तीच वर्णन करीत आहे:–"चिंताज्वरांत रात्रौ माझा नाहींच लागला डोळा। जाण्यासाठीं कंठीं शतवार प्राण जाहले गोळा॥"

अहाहा! इतकी तळमळ लागल्यावर रुक्मिणीसारख्या सर्वस्वार्पण करणाऱ्या प्रियबालेच्या भक्तीचा अंत त्या दयाघनास अधिक कसा पाहवेल? "तरी रंक एक नाडलेपणें। काकुळती धांव गा धांव म्हणे। तरी तयाचेनि येणें। काय न घडे मज?॥

आणि भक्तांही तेचि दशा ?॥" छे! हें केवळ अशक्य. रुक्मिणीची ती पत्रिका--प्रेमानें फुललेली ती प्रेमपत्रिका पाहून त्यांचें हृदय कळवळलें होतें व ते येण्यास निघालेहि होते. पण विरहावांचून प्रेमलतिका तितकी भरारत नाहीं. रुक्मिणीला निराशेच्या हद्दीवर आणून मगच तिला उचलण्यांत जास्त मौज होती. " हाय! हाय! देवा! आपली ' सांवळी काया ' पहाण्यासाठीं उतावीळ झालेल्या, आपले ' मनोहर रूप ' या नयनांत सांठविण्यासाठीं अधीऱ्या झालेल्या ह्या अभागिनीची आपणांस कांहींच कींव येत नाहीं काय? अथवा तें दुर्लभ सगुणब्रह्म ह्या हतभागिनीला कुठचें दृष्टीस पडायला आणि कुठलें मिळायला?" या रुक्मिणीच्या शोकोर्मींनीं पाषाणसुद्धां ढळढळा रडायला लागतील मग आमचा प्रभु तर दयाघन होता! असो. याप्रमाणें निराशेच्या कांठावर रुक्मिणी उभी होती, ' आसवांचें जल ' सारखें झरझर वहात होतें, तोंच शुभशकुनास प्रारंभ झाला. त्या वेळचें सुखद वर्णन वैदर्भी करते " तों प्रियकंठीं आपण पडोन हेही सुखांत पाडावी। या भावेंचि स्फुरली कारे माझी भुजलता कृपा डावी ॥" श्रीकृष्ण विदर्भनगरीशेजारील अंबिकापुरीं येऊन राहिले होते. रुक्मिणीला अंबिकेच्या दर्शनास नेलें तेव्हां " मग वाई! दादाचे मागधचैद्यादिकांहि मेल्यांचे । सैनिक मज रक्षाया आले." रुक्मिणी त्या रक्षकांच्या परिवारांनीं वेष्टित अंबिकेचें दर्शन घेऊन देवळाबाहेर येत आहे तोंच " माझा मूर्त मनोरथ तो रथ आला प्रियास घेऊन." श्रीकृष्ण सर्व रक्षकसैन्य झोडपीत रुक्मिणीजवळ जाऊन ठेपले व " माळा ऊचलिता प्रिय आपणहि रथावरूनिया लवला । लव लागेना तों घे अंकीं, करुणासमुद्र कालवला ॥" श्रीकृष्णरुक्मिणीचें दिव्य मंगल मीलन वाचकांनीं झटपट पण क्षणैकच अवलोकन करावें! कारण त्या सुंदर देहास अंकावर घेऊन श्रीकृष्णास शिशुपालजरासंधादि दुष्टांचा अथांग सेनासागर फोडीत पार पडायचें आहे. हां हां म्हणतां श्रीकृष्णप्रभु बिजलीसारखे त्यांतून बाहेर पडले त्या वेळेस इकडे शिशुपालादि ' कावळ्यां ' ची जी ' कावकाव ' सुरू झाली त्याचें पंत वर्णन करतात-" हंसें मुक्ता नेली मग केला कलकलाट काकांनीं ॥ हाकांनीं नभ भरिलें जाय सुरांच्याहि नाद हा कानीं ॥" एकंदरींत सुभद्राहरणाप्रमाणेंच रुक्मिणीस्वयंवराचा प्रसंगहि पंतांनीं मोठा बहारीनें वर्णिला आहे यांत शंका नाहीं. अस्तु. याप्रमाणें श्रीकृष्णानीं-त्या कृष्णभ्रमरानीं-रुक्मिणीची प्राप्ति करून घेऊन तिला सुखी केलें!

श्रीकृष्णाच्या एकंदर अष्टनायिका होत्या व त्यांतहि सत्यभामा व रुक्मिणी ह्या प्रभूस विशेष प्रिय असत. सत्यभामेच्या कथेचा वृत्तांतही असाच पण निराळ्या

रितीनें मनोरंजक आहे. कारण यांतच ' भल्याभल्यांची अब्रू घेणाऱ्या ' स्यमंतक मण्याची कथा आहे. ही कथा म्हणजे प्रभूवर आलेला चोरीचा आळ होय. यादवांपैकीं सत्राजित नांवाच्या एका सरदाराचा भाऊ त्याचा स्यमंतक मणि गळ्यांत घालून मृगयेस गेला असतां एका सिंहानें त्यास फाडून खाल्लें. त्या सिंहापासून अस्वलांचा राजा जांबवान् यानें तो स्यमंतकमणी चोरून नेला. इकडे तो मणी कोणीं नेला याचा पत्ता लागेना तेव्हां त्या अविचारी सत्राजितानें, श्रीकृष्णानीं तो त्याजवळ राजाच्या खजिन्यांत ठेवण्यासाठीं म्हणून एकदां मागितला होता, याच केवळ सबबीवर संशय धरून कांहींएक विचार न करतां त्या मण्याच्या चोरीचा आळ बेधडक श्रीकृष्णावर लादला ! तेव्हां प्रभूना साहजीकच राग येऊन तो आळ नाहींसा करण्यासाठीं त्यांनीं जांबवानाशीं २७ दिवस अहोरात्र युद्ध केलें व त्यास जेर केला. " त्रिनवरात्र जो दांडगा भांडगा भांडला " अशा तऱ्हेचे त्या अस्वलांच्या राजाचें पंतानीं वर्णन केलें आहे. असो. याप्रमाणें त्या राजाला जेर करून सत्राजिताचा हरवलेला मणी श्रीकृष्णांनीं त्याचा त्यास आणून दिला. तेव्हां आपण खोटाच आरोप केल्याबद्दल त्या राजाला पश्चात्ताप होऊन तो प्रभूस शरण गेला व त्यानें आपली मुलगी–सत्यभामा–कृष्णास अर्पण केली. जांबवानानेंही आपली मुलगी–जांबवती–शूर व लढवय्या कृष्णाला अर्पण केली. श्रीकृष्णांनीं आपला " सुधासीकर " हात तिच्यावरून फिरवून तिला " उजरिली " व मग तिचा स्वीकार केला. याप्रमाणें या स्यमंतक मण्याच्या आख्यानांत श्रीकृष्णास दोन भार्यांची प्राप्ति झाली. पण तें आख्यान मात्र तेथेंच खलास झालें नाहीं. सत्यभामेची पूर्वींच मागणी घालणारा शतधन्वा तीं श्रीकृष्णास मिळाली–" विश्ववैभवाची ती वैजयंती लक्ष्मीवल्लभासारख्या लोकैक वीराच्या गळ्यांत पडली " म्हणून चिडून गेला. " आपल्या भिकारी भाग्यदेवतेला दोष " देण्याचें टाकून त्या " भणंग भिकाऱ्या " नें याचा निर्दय सूड सत्राजितावर उगवला व लाक्षागृहांत दग्ध झालेल्या आपल्या आतेस व आतेभावांस-कुंतीस व पांडवांस–याच वेळीं तिलांजली देण्यास श्रीकृष्ण हस्तिनापुरास गेले आहेत ही संधि साधून त्या शतधन्व्यानें सत्राजिताचा खून करून तो मणि पळवला. शेवटीं त्यास काशीजवळ ठार मारून श्रीकृष्णास तो मणि मिळाला नाहींच. कारण तो अक्रुराजवळ-दानपति अक्रुराजवळ होता. परमार्थासाठीं कां होईना पण अक्रूरासारख्या भगवद्भक्तास त्या रोज दोन भार सोनें देणाऱ्या मण्यानें लोभ उत्पन्न केला हें पाहून त्या ' शत्रू ' चें–लोभाचें क्षणैक आश्चर्य वाटतें. असो. याशिवाय श्रीकृष्णाच्या नग्नजिता, कालिंदी इत्यादि पांच

मुख्य भार्या होत्या. या अष्टनायिकांशिवाय हजारों कुमारिकांनीं त्यांस आनंदानें वरिलें. प्राग्ज्योतिषाचा-आसामचा राजा नरकासुर हा रावणाचा किंवा मांटेझुमाचा भाऊच शोभला असता. कारण यानें हजारों सुंदर कुमारिकांस बंदींत टाकलें होतें. श्रीकृष्णांनीं नरकासुरास मारून त्यांची मुक्तता केली व त्या कुमारिकांनीं आनंदानें त्यांस माळ घातली. असो.

सत्यभामा व रुक्मिणी या दोघींत रुक्मिणी ही प्रभूची अधिक प्रिय होती. कारण तिचा प्रभुचरणीं भावच तसा अलौकिक होता. पण हें सत्यभामेच्यानें पहावेना. तिला असा गर्व होता कीं, प्रभूचें माझ्यावरच जास्त प्रेम आहे व देव माझ्याच जास्त अंकित आहेत. हा भामेचा गर्व हरण होण्याचा एक मजेदार प्रसंग जुळून आला–किंवा आणला गेला म्हणा पाहिजे तर. तो प्रसंग असा कीं एकदां नारदमुनींची स्वारी द्वारकेस गेली असतां भामेनें त्या मुनींचें यथाविधी पूजन करून त्यांस प्रश्न केला कीं “ प्रभूची मजवर सर्वांत जास्त प्रीति आहे. पण प्रभु माझाच सदैव कसा राहील ? त्याला काय बरें युक्ति करावी ? ” त्यावर नारदानीं उत्तर दिलें कीं “ याला एकच उपाय म्हणजे जी वस्तु आपणाजवळ नेहेमीं असायला पाहिजे तिचें दान करणें ! ” त्या वेळीं सत्यभामेनें कृष्णाच्या दानाचें उदक नारदांच्या हातावर सोडलें ! नारद लगेंच कृष्णास घेऊन चालूं लागले तेव्हां त्या प्रेमळ भार्येस वाईट वाटणें साहजीक आहे ! पण त्याला आतां काय उपाय ? पुढें रुक्मिणीच्या महालांत ही बातमी कळल्याबरोबर तर ती–रुक्मिणी–बेशुद्धच पडली ! शेवटीं सर्व अष्टनायिकांची फारच विनवणी ऐकून कृष्णाच्या भारंभार सोनें किंवा इतर पदार्थ घेऊन कृष्णास परत देण्यास नारद तयार झाले. त्याबरोबर सत्यभामेनीं आपले सर्व दागिने कृष्णाच्या तुलेंत घातले, पण कृष्णाचें पारडें जमिनीवरून हलेना देखील ! इतर राण्यांच्या अलंकारांची तीच गत झाली. किंबहुना द्वारकेंत एकही सोन्याची गुंज अशी नव्हती कीं जी कृष्ण-प्रभूच्या तुलेसाठीं–व त्यायोगें होणाऱ्या कृष्णनाथाच्या प्राप्तीसाठीं–त्या तराजूंत येऊन पडली नाहीं. पण ज्याचें नांव तें ! कृष्णाचें पारडें यत्किंचित्ही हलेना ! शेवटीं रुक्मिणी पुढें आली व म्हणाली “ अनंतकोटी ब्रम्हांडनायकाची तुला आपण पामरांनीं काय करावी ! त्याची खरी तुला एका भक्तीच्या–दृढ भावाच्या बळावरच होणार आहे. यासाठीं त्या प्रभूच्या चरणीं अनन्य लीन होऊन फूल नाहीं फुलाची पाकळी या न्यायानें माझ्या अल्प भक्तीचें दर्शक असें मी हें ‘ तुलसीदल ’ या तराजूच्या पारड्यांत घालतें ! ” असें म्हणून तिनें कृष्णाच्या उलटच्या पारड्यांत तें

तुलसीदल टाकलें तों काय चमत्कार! प्रभूचें पारडें चट्दिशीं वर झालें! सत्यभामेचा गर्व परिहार झाला. " रुक्मिणीनें एक्या तुलसीदलानें गिरिधरप्रभु तुळिला " ही ओळ ह्याच प्रसंगास अनुसरून आहे हें सूज्ञ वाचकांनीं जाणलेंच असेल. अस्तु.

आतां आपण भक्त सुदाम्याच्या रम्य पण करुण कथेकडे वळूं. सुदामदेव असें त्यास म्हणत असत. पण त्याचें खरें नांव सुदामा. हा ब्राह्मण अतीशय दरिद्री. त्याच्या गरीबीचें वर्णन करणेंहि कठिण आहे. " घरांत वाजे नकार घंटा। पोरें भुकेनें करिती तंटा " इत्यादि वर्णनें वाचकांस ठाऊक असतीलच. खायला पोटभर अन्न नाहीं, ल्यायला अंगभर धड वस्त्र नाहीं, अशा स्थितींत तें गरीब बापडें कुटुंब आपली संसारयात्रा कशी कंठीत असेल याची कल्पना तो दुर्धर प्रसंग ज्यावर असेल त्यासच येणार आहे. सांप्रतच्या हिंदवासीजनांपैकीं पुष्कळांस मायबाप सरकारच्या कृपेनें याची योग्य कल्पना करतां येणें शक्य आहे. अरेरे! त्या सुदाम्याचे व त्याच्या कुटुंबाचे हाल डोळ्यांपुढें ऊभे राहिले, त्या कल्पनाचित्राकडे जरी क्षणमात्र पाहिलें तरी हृदय फाटून जातें! खायला पोटभर मिळत नसल्यानें हातापायांच्या काड्या झाल्या आहेत, पोट खपाटीं गेलें आहे; फाटक्या तुटक्या वस्त्रांनीं सर्वांच्या देहाची लज्जा कशीबशी रक्षण होत आहे, " अन्न अन्न " करून मुलें आईला सतावून सोडीत आहेत व मोठ्या कष्टानें भीक मागून किंवा मोलमजुरी करून आणलेल्या चार दाण्यांचा घास मुलांच्या तोंडांत घालतांना प्रेमळ मातेच्या डोळ्यांतून त्या खडतर दैवाबद्दल टप्टप् अश्रू पडत आहेत हा देखावा पाहून कोणाच्या हृदयाचें पाणी होणार नाहीं?

पण इतकेंहि असून तें कुटुंब—विशेषतः सुदामा—त्यांतल्यात्यांत सुखानें व समाधानानें रहात होता. कारण तो आत्मज्ञानी, ब्रह्मनिष्ठ, व स्थितप्रज्ञ होता. " मात्रास्पर्शास्तु कौंतेय शीतोष्ण सुखदुःखदाः। आगमापायिनो नित्यास्तान् तितिक्षस्व भारत " हा भगवंतांचा भावी उपदेश त्यास ठाऊक होता. निस्पृह व आत्मज्ञानी पुरुष अशा बाह्य विपत्तींचे डोंगर कोसळले तरी अचलच असतात. त्यांच्या हृदयांतील भगवंताच्या भजनाची बैठक कायमच असते. प्रारब्धाचे भोग भोगल्यावांचून गत्यंतर नाहीं हें त्यांस ठाऊक असतें. सुखप्राप्तीच्या वेळेस देवाचें नांव घेऊन दुःखाच्या राशी अंगावर आदळूं लागल्या कीं, परमेश्वरास शिव्या देत सुटणारे ते तुम्हां आम्हां-सारखे प्राकृत नसतात. " न मिळो खावया न वाढो संतान। परि हा नारायण कृपा करो " हीच त्यांची अहर्निश तळमळ असते. इतकेंच नव्हे तर " दारिद्र्याच्या

मधुर फायद्यां " चा ते योग्य उपयोग करून उलट " बरें झालें देवा ! निघालें दिवाळें " असा ईश्वरास धन्यवादच देत असतात. " देव भक्तालागीं करु नेदी संसार " हेंच खरें !

तथापि बारा वाजण्याची वेळ मोठी कठिण असते. " भूक लागली असतां मोठा शंकराचार्य सुद्धां भाकरीचा तुकडा चोरील " अशी एक सर्वियन लोकांची म्हण आहे, त्यांत अगदींच तथ्य नाहीं असें नाहीं. " बुभुक्षितः किं न करोति पापं । क्षीणा नरा निष्करुणा भवंति " असें म्हटलें आहें तें खरें आहे. पण ह्या सर्व गोष्टी प्राकृत जनांस लागू आहेत. त्यांतील सार इतकेंच कीं, मोठा ब्रह्मज्ञानी झाला तरी त्याला क्षुधेची व्यथाहि जाणवतेच. देह आहे तोंवर देहधर्मांची जाणीव होणारच. पण त्या कामीं तितिक्षेचा अंगीकार करून, आत्मस्वरूप ओळखून रास्त मार्गानें जाणें हें साधूच करूं जाणे. तथापि भुकेची वेळ मोठी कठिण हीहि गोष्ट तितकीच खरी आहे. सुदामदेव जरी ब्रह्मनिष्ठ असला व सदा आत्मानंदीं मग्न असला तरी त्याची भार्या व मुलेंबाळें ह्यांची तितकीच कशी स्थिति असणार? तुकाराम व त्यांचें कुटुंब यांत असाच फरक नव्हता काय ? पण जिजाईपेक्षां सुदाम्याची बायको जास्त शांत मर्यादशील व भिडस्त होती. परंतु अठरा विश्वे दारिद्र्याच्या कहारापुढें त्या साध्वीचा कुठवर टिकाव लागावा ? " त्या विप्राची भार्या आर्या मलिना कृशा कुचैला " अशी ऐनबारा वाजतां पोटापाण्याच्या चिंतेनें व्याकुळ झाली असतां एकदां नारद-ऋषी येऊन तिला मारे ब्रह्मज्ञानाच्या गोष्टी सांगूं लागले. " क्षुधातृषादी प्राणधर्म हे बाधिति कवणाला " इत्यादि त्यांचें व्याख्यान ऐकून " ब्रह्मज्ञान नको तुझें मुनि-वरा येई न कामास तें । द्यावें अन्न शिशूंस अल्प तरि हो पायांस मी लागतें " असें त्या प्रेमळ मातेनें उत्तर दिलें. यावरून हीच गोष्ट सिद्ध होतें. नुसत्या ब्रह्म-ज्ञानाच्या कोरड्या गप्पानीं पोटांत भडकलेली क्षुधेची आग कशी शांत होणार ? अस्तु.

तेव्हां एकदां " ते एकदां पतीच्या पाशीं बहु भीत भीत गेली । अवाङ्मुखीं-कंपिततनु साध्वी कर जोडुनिया ठेली " मनांत हेतु हा कीं एकदां पतीला कृष्णाकडे पाठवून कांहीं पोटास मिळाले तर पहावें. पण कृष्णपरमात्मा स्वतः पतीचा मित्र असून ते स्वतः जर त्याच्याकडे अद्याप गेले नाहींत तर आपण कसें त्यांस तसें सांगावें ही भीतिहि आंतून वाटत होतीच. पण त्याच बरोबर संसाराच्या विविध तापानें गांजलेल्या त्या साध्वीचा कंठहि दुःखानें सद्गदित झाला होता. अशा भय-गद्गद स्थितींत निरुपाय होऊन मोठ्या कष्टानें ५५ अत्यंत लीनतेनें तिनें शेवटीं आपल्या

पतीस सुचविलें कीं " भेटाया त्या दीन बंधुला द्वारावतिला जावें । गाता ध्याता परि सखयातें नेत्रें अवलोकावें ॥ भजकाला आत्माही देतो ऐसा उदार तो कीं । दीनजनांचा कल्पवृक्ष ही कीर्ति तयाची लोकीं ॥ ......देइल कांहीं दयालु तो प्रभु रक्षाया हीं बाळें । तुम्हाला स्वसख्याचें दर्शन घडेल बहुतां काळें ॥ " हें स्त्रीचें ' प्रियहित ' भाषण ऐकून सुदाम्यास संतोष वाटला व तो जाण्यास निघाला. पण " रिक्त पाणिनें न विलोकावा गुरु ऐशी स्मृतिवाणी " म्हणून भार्येनीं—हाय !—' भिक्षा मागुनि ' आणलेल्या पोह्यांचीच फाटक्या चिंध्यांत बापड्यानें पुरचुंडी बांधली व तो आनंदानें श्रीहरीच्या दर्शनास निघाला।

ईश्वरचिंतनांत गढलेला सुदामा लवकरच द्वारकेस येऊन पोंचला तोंच " अमरावतीसमाना द्वारावती परी कनकाची " पाहून तो थक्कच झाला. " एकापरीस एक सुरम्यें यादवगृहें अपारें " व स्वर्गसुखासही मागें सारणारी व सत्यवतीस–इंद्रपुरीस –ही लाजविणारी तेथील शोभा व आनंद पाहून सुदाम्यास–दारिद्र्योपहत सुदाम्यास काय वाटलें असेल याची वाचकांनींच कल्पना करावी. श्रीकृष्णाच्या सोळाहजार एकशेआठ बायकांचे ते उत्तुंग प्रासाद ! " त्यांतुनि एका गृहांगणीं तो गेला ब्राह्मण दीन " त्यावेळेस प्रभू " श्रीरुक्मिणिच्या पलंगीं तेव्हां होता जगन्निवास । तेथें कळलें कीं भेटाया आलासे निजदास ॥ " तें कळल्याबरोबर त्या दयाळु माधवाच्या हृदयांत मागील सर्व प्रसंग आठवून त्याची जी लगबग उडाली व धांवत जाऊन सुदाम्यास कडकडून मिठी मारून त्यानें जे प्रेमाश्रू ढाळले व सुदाम्याचे आदरातिथ्य केलें त्याचें नितांतरम्य व सहृदय वर्णन आपण पंताच्याच तोंडून ऐकूंया:–" झडकरि उठला दयाळु माधव वस्त्रादिक नावरितां । धांवत आला पुढें रमेला सांडुनि दासाकरितां ॥ ये यें बंधो ऐसें सद्गद बोलत धांवत आला । कडकडुनी भुज-युग्में स्वसख हृदयीं धरिता झाला ॥ मित्रांगस्पर्शानें झाला सुखी दयेचा सिंधू । लोचनपद्मापासुनि गळती प्रेमाश्रूंचे बिंदू ॥ धरुनि स्वसखा करीं हरीनें पर्यंकीं बैसविला । " काय हें अलौकिक मित्रप्रेम ! वाचक ! गरीब द्रोणाचार्यास भर दरबारांतून हांकून देणारा द्रुपद आपणास आठवतो काय ? " तें चित्र पहा व हें चित्र पहा " एवढेंच आमचें आपणांस सांगणें आहे ! अस्तु.

पण एवढ्यानेंच काय झालें आहे. पुढील आदरातिथ्य तर पहा:–" जल घाली रुक्मिणी पदावारि मणिकनकाच्या पात्रें । प्रक्षालन केलें श्रीनाथें सुख-रोमांचित गात्रें ॥" अहाहा, पंत म्हणातात " ज्याचे चरणापासून निघालेल्या गंगेनें शंकराच्या मस्तकावर

उचस्थानीं विराजमान व्हावें त्याच परमात्म्यानें–त्या तीर्थांच्या तीर्थरूपानें-श्रीहरीनें सुदाम्याचें पादोदक घ्यावें काय ? " ह्या भक्तवत्सलतेला, ह्या ब्रह्मण्यपणाला, ह्या मित्रप्रेमाला जगांत दुसरी तोडच नाहीं ! असो; त्यानंतर " गंधालेपें धूपें दीपें पुष्पें " इत्यादि करून प्रभूनीं त्याची पूजा केली. व सुदामदेवास उकाड्याचा त्रास होऊं नये म्हणून ऋद्धिसिद्धि जिच्या दारांत 'वोळंगत' आहेत ती रुक्मिणी " व्यजन-चामरें घेऊनि हातीं शैव्या घाली वारा. " ह्या भाग्याला कांहीं सीमा आहे काय ? देव भक्ताचा किती अंकित असतो–भुकेला असतो–याचें प्रत्यंतर वाचकांनीं येथें मनमुराद पाहून घ्यावें. असो. यानंतर मग त्यांच्या मागील–गुरुगृहीं असतांनाच्या गोष्टी सुरूं झाल्या. गुरुगृहाहून निघाल्यापासून बापडा सुदामा दारिद्र्याच्या समुद्रांत वहावत गेला होता व कृष्णप्रभू सुखसागरांत तरंगत होते. दोघेही सध्यां दैविक योगानें पुन्हां मित्रप्रेमाच्या नौकेंत एकत्र बसले होते. तेव्हां साहजीकच " हें सारें मजला आठवतें स्मरतें कीं तुज नाहीं ? " म्हणून " सांदीपनि गुरुच्या पत्नीनें काष्टें आणायासी । पाठविलें विपिनाला स्मरतें तें माझ्या हृदयासी " असें ते बोलूं लागले. " मित्रा ! " श्रीकृष्ण बोलत होते " त्यावेळेस 'कालावांचूनि आला जल-धर, सुटला वात, अंधार झाला' अशी भयंकर वृष्टी झाली व त्यावेळेस आपण 'वर्षे कांकडलों जळांत पडलों' व मग 'प्रातःकालीं श्रीगुरु आला आम्हां शोधायाला' तें तुला आठवतें ना ? अहाहा ! किती तें गुरूचें प्रेमळ व दयाळु हृदय ! " असो. फार दिवसांनीं भेटलेल्या त्या जिवलग मित्रांचीं याप्रमाणें प्रेमसंभाषणें झाल्या-वर मग " देव म्हणे सखया मज द्याया काय उपायन आजी । आणिलें असेल देउनिया तें वांछा पुरवीं माझी " तो प्रश्न ऐकून गरीब बापडा ब्राह्मण किती संकोचला असेल याची कल्पना त्याच्यासारख्या दरिद्र्यावांचून इतरास होणें नाहीं. " संकोचला अधोमुख बसला विप्र न बोले कांहीं. " पण मित्रप्रेमाचें भरतें आलेल्या आमच्या प्रभूस कुठलें राहवायला ? त्यानीं त्याच्या कांखेस हात घातलाच व ती पोह्यांची पुर-चुंडी बाहेर काढली. सुदाम्यास मेल्याहून मेल्यासारखें झालें. पण आमच्या भक्त-वत्सल प्रभूचा आनंद पहा ! त्या पोह्यांची एक मूठ तोंडांत टाकून प्रभू म्हणतात, " भूतात्म्याला मजला तर्पिति पोहे हे बहु फार । याहुनि न रुचे भुवनीं बंधो अन्य उपायनसार. " 'अहाहा ! " देव म्हणाले " मित्रा ! किती हे गोड पोहे आहेत ! यावरून पंच पक्वान्नांचीं ताटें खरोखर ओंवाळून टाकावींत ! " असें म्हणून " ऐसें स्तवुनि उपायन दुसरी मुष्टि श्रीपति उचली. " पण रुक्मिणीला तें कसचें पाहवतें !

ती तरी प्रभूचीच भार्या ! अर्थात् तितकीच भक्तवत्सल. तिनें लगेच " तों रुक्मिणि धरि कर धांवोनी म्हणे मला ही रुचली ! " अहाहा ! ज्यांनीं नेहेमीं षड्रस पक्वानांचें भोजन करावें त्या रुक्मिणी-पांडुरंगांनीं सुदाम्याच्या पोह्यांसाठीं अशी प्रेमळ झोंबी खेळावी ही भक्तवत्सलतेची व भक्तप्रेमाची खरोखर हद्द झाली ! रुक्मिणीनें ती सर्व पुरचुंडीच उचलली व " पोहे नेलें हिरोनि भगवत्--पर-पद्मजा सतीनें । प्रार्थुनि रिझवुनि हंसवुनि रमवुनि निज पतिला सुमतीनें !" तो देखावा पाहून सुदाम्याचें हृदय भक्तिभावानें किती भरून आलें असेल व त्याच्या नेत्रांतून प्रेमाश्रूंच्या धारा कशा वाहूं लागल्या असतील याची कल्पना त्याच्यासारख्या भक्तासच येणार आहे. "देवा !" सुदाम सद्गदित होऊन म्हणाला, " गरीबाचे पोहे आपण व रुक्मिणीमाउलीनें गोड करून घेतले हा आपला थोरपणा आहे !" त्याच्यानें जास्त बोलवेनाच.

परमेश्वराच्या वरील भक्तवात्सल्याचें कोठवर वर्णन करावें ? देव भावाचा किती भुकेला असतो याची साक्ष वरील गोष्ट पटवीत आहे. " तुलसीदल पाणी । चिंतनाचा भुकेला ' असें तुकोबा म्हणतात तें खरें आहे. भिल्लिणीचीं प्रेमानें दिलेलीं बोरें ज्या प्रभूनीं आनंदानें खाल्लीं, विदुराच्या कण्या अलौकिक प्रेमानें व आवडीनें ज्या प्रभूनीं सेवन केल्या, द्रौपदीच्या भाजीच्या पानावर जो हरी संतोष पावला त्याच प्रभूनें सुदाम्याचे पोहे मोठ्या आनंदानें भक्षण करावेत हें साहजीकच आहे. कारण " पत्रं पुष्पं फलं तोयं यो मे भक्त्या प्रयच्छति । तदहं भक्त्युपहृतं अश्नामि प्रयतात्मनः " असें त्यांचें ब्रीदच आहे. प्रभूला खरी भक्ती हवी. दुर्योधनासारख्याच्या " दाटुनि " केलेल्या " आग्रहा " स ते ' डावलून ' जातात व विदुर-सुदाम्यासारख्या भक्तांच्या झोंपडीकडे प्रभू आनंदानें धांव घेतात तें याचसाठीं ! सर्व पृथ्वीच्या वैभवाची जरी हवेली उठवली तरी भक्तीवांचून ती फोल आहे; त्यापेक्षां प्रभू " साधुची झोंपडी बरी रे " असें उद्धवास म्हणत आहेत त्याचें हेंच कारण. शंकरासारख्या दिव्य तपस्व्यानें ज्याची ' पायवणी माथा वहावी,' ' अमरपुरीसारख्या घरकुलांचा व इंद्रादिक बाहुल्यां ' चा खेळ खेळणारी लक्ष्मी " पाय धुवाचिया दैवा " जिथें " पात्र " होते, वेदासारखे सर्वज्ञ जेथें ' नेति नेति ' म्हणून मागें सरतात, व हजार जिव्हेचा शेषही ज्या प्रभूच्या " आंथरुणातळवटीं " दडतो त्या प्रभूपुढें " येर प्राकृतें हेंदरें केंवि जाणो लाहे ? " त्या प्रभूला आपल्या भपक्यानें चकवण्याचा यत्न करणें किती विफळ आहे बरें ? एक खरी भक्ति धरा, मग प्रभू दुसऱ्या कशाचीही चौकशी करीत नाहीं. तुमचें जातगोत, कुलशील, विद्यावय,

गरिबीश्रीमंती यांपैकीं त्याला कांहींच नको आहे. कारण " एक भाव नाहीं माझा । तरी पाल्हाळ तें " असें त्यांचें निक्षून सांगणें आहे. " भलतिया यातीं जन्मावें " " मूर्ख जैसे का दगड " असावें, पण एक ईश्वराची भक्ती करावी म्हणजे सर्व सार्थक झालें. मग त्या भक्तीसाठीं तुम्हांस लक्षावधि पुष्पहारांनीं असंख्य दीपांच्या झगझगाटांत परमेश्वराची पूजा बांधतां आली नाहीं व षड्रसांचें सुवर्णपात्र प्रभूपुढें ठेवतां आलें नाहीं तरी प्रभूस त्याची पर्वा नाहीं. उलट भावावांचून तीं त्याला नकोशीं होतात व भावानें अर्पिलेली एखादी पोह्याची मूठच प्रभूला " मज अमृताहूनि सुरसें । बोनी वोगरिली बहुवसें ! " अशी वाटते. सुदाम्याचें उदाहरण घेऊन प्रभूच अर्जुनास ज्ञानेश्वरमुखानें सांगतातः- " हें सांगावें काय किरीटी । तुवांचि देखिलें आपुलिया दिठीं । मी सुदामयाचिया सोडीं गांठी । पव्हयासाठीं " असो. प्रभूची भक्तवत्सलता वर्णावी तितकी थोडीच आहे.

आतां वरील प्रसंगाचें वर्णन अमृतराय आपल्या ठेकेदार व शब्दचमत्कृतिमय कटावांत कसें करतात तें वाचकांस सांगून नंतर त्यांच्याच शब्दांत प्रभूंनीं सुदाम्यास घातलेल्या भोजनादिकांचें वर्णन करण्याचा आमचा विचार आहे. प्रभूंनीं सुदाम्यास पाहिल्यावर " लगबग लगबग अंकिं रुक्मिणी बसली ते पर्यंकीं लोटुनि, उडी घालुनी, धांवत धांवत स्वयें येऊनी, ब्राह्मणचरणीं मस्तक ठेवुनि, दंडवत्‌मनें मिठी घालुनी, उठी उठी म्हणतांचि सुदामा चहूभुजीं कडकडुनी त्यातें दृढ आलिंगुनि, प्रेमबाष्प वारि तें लोचनीं स्फुंदत स्फुंदत कडे घेउनी, नाचत नाचत पूर्ति नव्हे प्रियमूर्ति द्विजाची निजासनीं, बैसविली ॥ " पुढें पाय धुवायला सुरवात झालीः- " नख मातीसह तें सांवरिलें, हळूहळू पदतळ कुरवाळुनि कंटक हरिलें, सुगंध शीतळ निर्मलजळ रखमाई ओती कांचनपात्रीं, प्रक्षाळुनिया अंचळवस्त्रें पुसोनि निर्मळ हृदयीं धरिलें, नेत्रीं लावुनि, मुकुट काढुनी, मस्तकिं वरिलें......धन्योऽहं कृतकृत्य मनीनें......चरणोदक सहकुटुंब सेवुनि......नवकेशर घनसारमलय पाटीर घनरसें भाळ चर्चिलें, सुखकारक शशिकिरणकरें उद्वर्तुनिया सर्वांग अर्चिलें ... ... ... दशांग गुग्गुळ धूपकूपभर तूप यूपसम तूळवर्तिका सूपसविस्तर दीपमालिका कूप लाविलें अमूप मध्यें भूप विप्रवर रूप भव्य भरपूर आणि कर्पूर दिवे बहु परिमळ वाहे ... ......पंचखाद्य नैवेद्य हृद्य मृदु......वाद्यपुरस्सर पद्यगद्य अनवद्य सद्यमुख विद्यमान, शुभनद्य जलाशय, मध्यमध्य पानियासहित श्रीआद्य हरीनें नैवेद्य समर्पुनि वेदवेद्य ब्राह्मणापुढें त्या "......नंतर भोजनासाठीं केलेली बाह्य तयारी पहाः-"नवे केळिचे खांब कोवळे,

लांबला व सह इक्षुदंड, वरि मंडप साखर निंबोळ्याचे घोस पोसले, लाल दुरंग्या नारंग्या सारंग्या लटकति, द्राक्षांचे घड पिकले रसाळ, मधुप झोंबती, मुक्त लोंबती ......विठाबाइनें ठाणें सोडुनि ठाणवया लखलखित ठेविल्या......नवरत्नाच्या चौरंगावरि श्रीरंगानें झुलत सुखप्रद विप्र बसविला, पीतांबर पडदणीस देउनि, खंबाइति भर्जरि नेसवुनि......घमघमघम कर्पूरवर्तिका, वाजंत्र्याचे बाजे वाजति, त्या फुलबाजा नळे हवाया,......मखरिं लोंबती घागरमाळा, घंटा घणघण, भंवत्या भंवत्या फिरति बायका, अष्टनायका...... जडवाचिया खडावांत हळु पाय देउनी- क्षीरोदक परिधान करवुनी "......त्यानंतर भोजनाचा थाट उडालाः-" मांडुनि स्वस्तिक सुवर्णपाट, अडणीवर सोन्याचें ताट, भंवता फलशाखांचा थाट...... आम्लरायतें, रुचिर आयतें, कोमळ अंगीं सगळी वांगी.. काथी ताथी साथी चरुसह चाकवत चुका, चवळी विवळी कवळ्या शेंगा, चिमकुरादल चिरुनि चांगली, चमचमीत फोडणी देउनि......कोहळा काशीफळें काकडी, कमळकंद कोवळी काचरी, दूध भोपळे दिव्य दोडके, दाळ दिंड शेवाळ वाळके......कंदमूळ फल फूलपात्र तरु, लेशमात्र घृतपाचिक शाका: दुरडी भरुनी धिरडी भाजुक साजुक नाजुक राजसवाणें, कानवल्यासि मानवले, साखरपोळ्या धिवर घारगे, मोतीचूर जिलेबी दलिया, बारक ओदन दे अनुमोदन......भातकेशरी परमकुसरी......मठ्ठा मिठ्ठा मटमटा बहु मधुर लापसी, लोणकडें थिजलें गाईचें तूप मधुर......वाटीभर एकेक घरीचे सोळाहजार पदार्थ आले." अशा रीतीनें तें थाटदार भोजन उरकलें. नंतर " रुहसनव गंगेरी पानें, विडा अर्पिला अति सन्मानें, कात रुक्मंगेरी पानें, चिकणि सुपारी ...... मौक्तिक भाजुनि चुना अर्कनिभ वर्ख शर्करा संक्षालित...... " असा विडा सेवितांच " कर्कगुरुसम गर्क सुदामा तर्करहित नृप अलर्क तैसा समाधिशयनीं शयन " करावयास सुदाम्याला कृष्णानें नेलें. पंत म्हणतात, " निजपर्यंकीं मृदु शयनावरि विप्राला यदुराय । निजवुनि परमादरें हळुहळू करें चुरी मग पाय। " केवढें हें सुदाम्याचें भाग्य! लक्ष्मीनें ज्याचे पाय चुरावेत तो प्रभु भक्ताचे पाय आपल्या कोमळ हातानें चुरतो! धन्य! गोपालकृष्णा! आपल्या वत्सलतेला सीमा नाहीं! आपण दीनदयाळ आहांत यांत तिळमात्र शंका नाहीं. दुसऱ्या दिवशीं मित्रवियोग होणार-आपला प्रियभक्त दूर जाणार म्हणून कृष्णांस गहिंवर दाटून आला! व त्यांच्या डोळ्यांतून खळखळ अश्रुधारा चालल्या. " पावित गेला दूर जगत्पति कंठ दाटला भारी । मित्रवियोगें प्रभुच्या वाहे नेत्रांतुनि वारी ॥ माझें स्मरण असोंदे

ऐसें म्हणे सगद्गदकंठ । आलिंगुनि वंदुनि विप्राला परते मग वैकुंठ ॥" या ठिकाणीं कोमलतेची, सहृदयतेची, करुणरसाची खरोखर हद्द झाली ! किंबहुना हें सर्वच आख्यान पंतांनीं तसें रंगविलें आहे. असो.

कृष्णप्रेमाच्या तंद्रींत गुंगून अश्रु ढाळणारा सुदामा देवाचा वियोग झाल्याबरोबर खडबडून जागा झाला--सावध झाला--तों प्रभूची ती सांवळी मूर्ति केव्हांच नाहींशी झाली होती. "अरे, पण मी देवाजवळ कांहीं मागायचें विसरलोंच कीं ! आणि देवा-नींहि पण कांहीं दिलें नाहीं. पण मागायला माझें चित्त कुठें ठिकाणावर होतें म्हणा ! पण आतां घरीं गेल्यावर बायको हंसेल ना ? हासूंदे बापडी ! पण प्रभुराज वदान्य-श्रेष्ठ खरे. कारण मला जर द्रव्य दिलें तर मग त्या द्रव्याच्या धुंदींत मी ईश्वरास विसरलों असतों म्हणून त्या दयाळु देवानें मला वित्त दिलें नाहीं. कारण त्याला माझें चित्त हवें आहे--तें सदैव त्याच्या चरणीं रहावें अशी त्याची व माझी इच्छा आहे. तेव्हां त्यानीं केलें हें ठीकच केलें." असें म्हणत स्वारी जों आपल्या गांवीं येते तोंच "तों त्याच्या दृष्टीला पडला सहसा तेजोराशी." सुदाम्याची नगरी अपर द्वारका झाली होती !--सुवर्ण नगरी बनली होती! पोह्याच्या एका मुठीच्या मोबदला सोन्याची नगरी भक्ताला अर्पण करण्याची वत्सलता देवावांचून इतरत्र दृष्टिस पडेल काय ? सुदाम्यासारख्या भक्ताला संसाराचे क्लेश पडल्यावर मग 'भक्तीचा सोस' हवा कशाला ? अनन्यचित्तानें ज्यांनीं प्रभूला सर्वस्व वाहिलें त्यांची काळजी जर भगवंतांनीं केली नाहीं तर तो भगवंत कशाचा ? " तैसा मी वाचूनि कांहीं । आणीक गोमटेंचि नाहीं " अशी ज्यांची स्थिति झाली, किंबहुना ज्यांनीं " मजचि-नाम पाहीं । जिणिया ठेविलें " त्यासंबंधीं प्रभू सांगतात--" ते एकवटूनि जिये क्षणीं । अनुसरल गा माझिय वाहणी । तेव्हांचि तयांची चिंतवणी । मजचि पडली ॥ ......आपुली तहानभूक नेणें । तान्हया निकें तें माउलीसीच करणें । तैसें अनुसरले जे मज प्राणें । तयांचें सर्व मी करीं ॥ ......ऐसा मनीं जो जो धरिती भावो । ता तो पुढा पुढा लागे देवो " अशी प्रभूच्या प्रेमळ सृष्टींत व्यवस्था असल्यामुळें भक्तांनीं हातांत माती धरली तरी त्याचें सोनें होऊन जातें. त्यांना संसाराची चिंता काडीभर देखील करावी लागत नाहीं. भाव मात्र दृढ हवा ! " मज होत कां विपत्ती । पांडुरंग राहो चित्तीं " अशी दृढ श्रद्धा हवी. परीक्षा पहाण्यासाठीं वर वर दुःखाचे डोंगर कोसळतील, नैराश्याच्या हद्दीवर जाऊन उभें राहावें लागेल, सर्वस्वाचा होम होईल, पण रुक्मिणीसारखी, सुदाम्यासारखी, विदुरासारखी, तुकोबासारखी

भक्ती व " देह जावो अथवा राहो । पांडुरंगीं दृढ भावो " असा दृढ निश्चय हवा.

असो. या ठिकाणीं श्रीकृष्णप्रभूच्या चारित्राचें स्वतंत्र असें बहुतेक कथन संपलें यापुढील भाग म्हणजे इतर सज्जनांप्रमाणें प्रभूही पांडवपक्षी कसे झाले, त्यांनीं द्रौपदीला पाठची वहीण मानून तिचें वारंवार सत्त्वरक्षण कसें केलें, व जरासंध, शिशुपाल, दुर्योधन इत्यादि दुष्टांना मारून एकंदर पांडवांना सुरक्षित ठेवून त्यांची सेवा बजावीत व त्यांस सौख्य देत त्या केशवकैवर्तकानें त्यांना अल्लाद असें भारतीय रणनदीच्या पार कसें उतरविलें तो समग्र इतिहास " महाभारता"शीं अत्यंत निगडित आहे व तो आपण " महाभारतां " त वर्णिलाच आहे.

प्रत्येक साकार वस्तून अंत हा केव्हांना केव्हांतरी आहेच. " आलीया आकारा अवघें नासें " असें तत्त्वच आहे. तें ईश्वरी अवतारास देखील चुकत नाहीं. व त्याप्रमाणें पुढें सर्व यादवांमध्यें मद्योन्मत्त अशी " यादवी " माजली त्यावेळेस आमचे प्रभूही एका व्याधाचा बाण शयितावस्थेंत पायाच्या अंगठ्यास लागण्याचें निमित्त होऊन ह्या नश्वर देहाचा त्याग करून गेले! कर्तुमकर्तुं शक्ति असणाऱ्या परमात्म्यानींहि केवळ वरील तत्त्वाचीं सत्यता पटवून देण्यासाठीं कालवशात् निजधामीं गमन केलें! अशा रीतीनें तें सुंदर रूप, सहज दृश्य अशी ती सांवळी मूर्ति जरी कालाच्या अनंतोदरांत– स्वतांच्याच अपररूपांत विलीन झाली असली तरी तिच्या निस्सीम उपासकांच्या–पुंडलिकानीं सुरू केलेल्या भागवत सांप्रदायांतील शेंकडों भक्तांच्या– ती दृष्टीस पडली आहे; नाथांच्या साठीं तिनें गंगेचें पाणी वाहिलें, जनाबाईचीं धुणीं धुवून तिला दळणकांडणास मदत केली, सांवतामाळ्याची भाजी खुडली, कबिराचे शेले विणले, तुकोबाच्या वह्या राखल्या, फार काय--दामाजीसाठीं तो दीनदयाळ 'विठु महार' ही झाला व यापुढेंही प्रत्येक निस्सीम भागवतास तो असाच साकार व सगुण भेटणें शक्य आहे. अशा त्या परममंगल प्रेममय प्रभूच्या चरणीं अनन्यभावानें नमस्कार करून आपण त्या अनंताच्या चरित्रावरून एकदां-शिरस्त्याप्रमाणें--शेवटची विहंगमदृष्टि टाकूं.

श्रीकृष्णाच्या त्या रम्य गोकुळाचा, तेथील त्या रमणीय निसर्गाचा, त्या अनागस गोपबालांचा, कृष्णभक्तीनें वेड्या झालेल्या त्या गोपसुंदरींचा कधींतरी विसर पडणें शक्य आहे काय? कृष्णकन्हय्याच्या 'सुनील तनुची' सांवळी 'घवघवीत प्रभा' नयनापुढून कधींतरी हलणें शक्य आहे काय? त्याच्या बांसरीचें तें प्रेमसंगीत हे कान कधींतरी विसरतील काय? प्रभूच्या प्रेमाचा तो दिव्य विलास मनःसागरा-

वर सदैव हेलावतच राहील. गोपालकृष्णाच्या चरित्रांतला प्रत्येक प्रसंग चित्ताला वेडावणारा असल्यामुळें त्याचा विसर पडणें कधींच शक्य नाहीं. पंतांनीं अत्यंत रसिकतेनें वर्णिलेला " गळती नेत्रांतूनि प्रेमाश्रुजळें फुलें शिराहूनी " इत्यादि वत्सलरसपूर्ण काव्यमय रमणीय प्रसंग, कुंजवनविहारांत आपल्या सख्यांशीं खेळणारी व शेवटीं " वंशीनादनटी " वगैरे थाटांत भोजनास बसलेली कन्हय्यालालाची ती श्यामसुंदर मूर्ति, मधुवनांत " अंगवक्र अधरीं धरि पांवा " अशा थाटांत उभे राहून आपल्या " मनमोहन वेणूच्या " ध्वनीनें चराचरांस वेड लावणाऱ्या मुरलीधराचें तें दिव्य रूप– अहाहा! यांची कधींतरी विस्मृति होईल काय? रासक्रीडेचा तो परममंगलप्रसंग– गौरनील वर्णांचें तें मधुर मीलन, प्रभूच्या वियोगकालीं होणारी गोपींची ती करुणस्थिति, कंसहननार्थ सज्ज होऊन खांबास टेकून उभ्या राहिलेल्या, पीतांबर कांसेस कसलेल्या प्रभूचें तें सुंदर ध्यान, सुदामदेवाचें आदरातिथ्य करून मित्रप्रेमाश्रु ढाळणारा श्रीकृष्ण भगवान्, शिष्टाईच्या वेळीं आपल्या झगझगीत तेजाचें प्रदर्शन करून बाहेर पडणारे श्रीपती, अर्जुनास " मग सरोष बोलों आदरिलें । जैसें मातेच्या कोपीं थोकलें । प्रेम अथी " ह्या प्रमाणें प्रौढ मातेच्या वत्सलतेनें पण बाह्य रोषानें मंदस्मित करून उपदेश करणाऱ्या कृष्णप्रभूची रथाधिष्ठित मूर्ति, व पांडवप्रेमानें वेडा होऊन त्यांच्या सुखासाठीं अहर्निश झटणाऱ्या व त्यांच्या दुःखानें विव्हल होणाऱ्या त्या प्रेममयाची ती प्रेमळमूर्ति इत्यादि कितीतरी चित्रांचा ठसा ह्या मनोभूमिकेवर कायमचा उमटला गेला आहे व त्यांतील कित्येक तर आत्मरसाशीं एकजीव होऊन गेले आहेत!

प्रियवाचक, अशा ह्या कृष्णाच्या चरित्राचें विहंगमदृष्टया आपणांस अवलोकन करावयाचें आहे. पण त्यापूर्वी आतांपर्यंत वर्णिलेल्या श्रीकृष्णचरित्रांतील त्याच्या स्वभावपरिपोषास कारणीभूत होणाऱ्या विविध छटा जमेस धरूनच वाचकांनीं पुढील ' अवलोकन ' वाचावें अशी सविनय विनंति आहे. श्रीकृष्णाचें मातृपितृप्रेम किती जागृत होतें याची साक्ष मध्वमुनींच्या " उद्धवा शांतवन कर जा" ह्या पद्यांत जें सद्गदित वर्णन आहे त्यावरून पटण्यासारखी आहे. श्रीकृष्णाचें आपल्या मित्रांवर व सवंगड्यांवर किती अलोट प्रेम होतें याची ओळख कालियामर्दनासारखे प्रसंग व ' कुंजवनविहार '--वनभोजन ह्यांसारख्या परमरसाल्हादक गोष्टी ह्यांवरून पटण्यासारखी आहे. श्रीकृष्णाचें भक्तप्रेम किती अगाध होतें हें सुदामदेवाची कथा सांगत आहे, भगवद्गीतेचा प्रसंग बोलत आहे, श्रीकृष्णाकडून द्रौपदीचा व पांडवांचा जागो-

जाग झालेला पाठिराखेपणा सर्व जगाला जाहीर करीत आहे, विदुर, रुक्मिणी ह्यां-सारख्यांच्या उत्कट भावाला देव भुलला तेंहि हेंच सांगत आहे. श्रीकृष्णाचा पराक्रम किती दांडगा होता हें पूतना, तृणावर्त, शकटासुर, इत्यादि शेंकडों राक्षस गोकुळांत मारले, रुक्मीसारखे वीर ' शिशुसम ' आणले, व चाणूर, कंस, शिशुपाल इत्यादि राक्षसांस ठार केलें, कालियासारखा भयंकर सर्प जेर केला इत्यादि गोष्टींवरून दिसून येणार आहे. गोवर्धनासारखे पर्वत करांगुलीवर उचलून-तोलून — धरणें, अरण्यांतील दावाग्नि पिऊन टाकणें इत्यादिकांवरून त्याच्या शारिरिक व विशेषेंकरून आत्मिक बळाची प्रतीति येते. श्रीकृष्णाच्या पायाशीं मथुरेचें राज्य लोळत असतां व सबंध पृथ्वीचें राज्य काबीज करण्याची अंगांत कुवत असतां तिकडे त्यांनीं ढुंकूनहि पाहिलें नाहीं व शेवटीं तो ' गवळ्याचा पोर ' च राहिला ह्यावरून त्यांची अलौकिक निस्पृहता दिसून येते. महत्त्वाकांक्षेच्या 'एकच प्याल्यां'त बुडालेला नेपोलियन, शिकंदर इ. कुठें व आमचे भगवान् कुठें! पण ' या सर्वांहुनि गोडगोड ' अशी, विशेष उत्कटपणें जर कृष्णचरित्रांतील कोणची गोष्ट मनावर ठसत असेल तर ती म्हणजे त्या श्यामसुंदराच्या प्रेमाचें दिव्यमोहन हीच होय. श्रीकृष्ण व गोपी ह्यांच्या अलौकिक प्रेमाचें चित्र चित्तास आकर्षून घेतें. पण याहूनही हृदयास डोलविणारा देखावा म्हणजे केवळ गोपीच नव्हेत तर प्रभूच्या नांवानें व प्रभूच्या ध्यानानें अखिल गोकुळांतील चराचर सृष्टीस जें वेड लागलें होतें तो होय. श्रीकृष्णाच्या—त्या घननीळ सांवळ्या कन्हय्याच्या—मुरलीच्या मधुरतम संगीताबरोबर सर्व गोकुळाची स्थिति कशी होत असे—नदीजलावरील तरंग, वायूनें डोलणारी तृणराजी, संथपणें चरणारीं गोधनें, सांसारिक व्यवसायांत मग्न झालेल्या गोपी व गोपबालें,-किंबहुना सर्व गोकुळ कसें त्याबरोबर ' थिजत ' असे—नाचत असे—डोलत असे ह्याचें वर्णन आम्हीं मागें केलेंच आहे; आणि सर्व चराचराचें हें दिव्यमोहन व कृष्णवियोगकालीं त्याचें होणारें करुणरुदन हा देखावा सर्वांत काव्यमय व हृदयस्पर्शी नाहीं असें कोण म्हणेल ?

अशा 'प्रेमगोड' गोपालावर कोण बरें प्रेम करणार नाहीं ? कृष्णकन्हय्याच्या मातापित्यांचें त्यावर किती उत्कट प्रेम होतें हें "मथुरेसि नेता श्रीकृष्णनाथ । तेचि क्षणीं आमुचा प्राणांत " होईल ह्या त्यांच्या उद्धवाशीं बोलतांना निघालेल्या एकाच उद्गारावरून स्पष्ट होत आहे. गोपबाळांचें प्रेम-अट्टाहा, लहानपणीं केवळ आईबापांचा लळा असणारीं तीं बाळें श्रीकृष्णानीं गद्गदून सांगितल्याप्रमाणें "आईबाप त्यजूनि बाळें मज-

संगें खेळत होतीं ! ” मध्वमुनींची ही एकच ओळ, पण त्यांत कितीतरी करुणरस सांठविला आहे ! अशा उत्कट प्रेमानें ती बाळगोपाळ मंडळी वेडी झाली होती. “चुकलिया माये । बाळ हुरुहुरु पाहे ” ह्या तुकोक्तीप्रमाणें आई---लाडकी आई-- क्षणैक दृष्टीआड झाली कीं पोरक्या पोरांप्रमाणें ज्या बालकांनीं दीनकरुणनयनानें व वदनानें “आई आई” करीत इकडे तिकडे पहावें, त्या बालकांलाहि आपल्या माता-पित्यांचा विसर पाडणारी ही कान्हाई माउली किती प्रेमळ असेल याची वाचकांनींच कल्पना करावी ! खुद्द प्रभूलासुद्धां “ आठवतें प्रेम जयांचें” त्या बाळांचें प्रेम प्रभूवर किती असेल बरें ? खुद्द गोपींचें कृष्णाच्या ठायीं किती प्रेम होतें हें पहावयाचें असेल तर नाथकृत गोपीविरहवर्णन वाचावें म्हणजे कळून येईल. वाचकांच्या प्रेमासाठीं आम्हीं तें मागें दिलेंच आहे. “आसुवांचा पूर नयनीं । हृदय फुटे मजलागुनी” अशी त्यांची स्थिति झाली ! आम्ही वियोगकालीन होणाऱ्या शोकादिकांवरून प्रेमाची कसोटी ठरवूं पहात आहों हें योग्यच आहे असें सूज्ञ वाचकांस कळून येणार आहे. कारण “ जाळावांचून कढ नाहीं व मायेवांचून रड नाहीं ” ही साधीभोळी म्हण-सुद्धां हेंच सांगते. अर्थात् ती ‘ रड ’ किंवा तें रुदन म्हणजे “ मोलें घातलें रडाया ” नव्हे हें काय सांगायला पाहिजे? असो. नंदयशोदा, गोपबाळें, व व्रजांगनाच तेव-ढ्या यमुनेच्या डोहांत कृष्णानीं उडी घेतली तेव्हां किंवा त्याहून अधिक तो मथुरेस गेला तेव्हां दुःखित होऊन वियोगानलानें ढळढळा रडल्या असें नव्हे, तर ज्या गाई-वांसरांना त्यांनीं अहर्निश रानांत चरावयास न्यावें तीं गाईवांसरेंसुद्धां श्रीकृष्णगमन-प्रसंगीं त्याच्या भोंवतीं जमलीं व टप्टप् अश्रु ढाळूं लागलीं ! साध्या व्यवहारांत सुद्धां जर आपणांस ही पशूंची माया पहावयास सांपडते तर श्रीकृष्ण तर प्रत्यक्ष प्रेमाचा पुतळाच होता. शकुंतलेच्या वियोगाचे वेळीं तिच्या पदराला मागें ओढून धरणाऱ्या हरिणबालाहूनहि श्रीकृष्णाच्या अंगास अंग घांसून दीनवदनानें त्याकडे पहात अश्रु ढाळणाऱ्या गोधनाचा हा देखावा अधिक चित्त हेलावणारा नाहीं असें कोण म्हणेल? किंबहुना सर्व चराचर सृष्टीस कृष्णवियोगकालीं दुःख होणें सुद्धां केवळ अपरिहार्य होतें व तें तसें झालेंहि “ कृष्ण कृष्ण इति पल्लव डोलती ” असा ज्या पल्लवांना कृष्णाचा---कृष्णनामाचा---छंद लागला होता तो श्यामसुंदर भगवान् गोकुळांतून जाणार या कल्पनेनें त्यांनीं “ हा कृष्ण ! हा कृष्ण ! ” म्हणून धायी धायी रडावें हें किती साहजिक---किती काव्यमय---आहे बरें ? आणि ही गोष्ट हेंच दाखविते कीं कन्हय्यालालावर सर्व गोकुळाचें अलोट प्रेम होतें !

ह्या प्रेमसागरांतून बाहेर पडायचें आमच्या जिवांवर येत आहे; पुनःपुन्हा त्यांत डुंबत राहून कृष्णकन्हय्याच्या सुंदर रूपाचें, मधुर मुरलीचें व प्रेमळ प्रीतीचें दिव्य संगीत गात रहावें असेंच वाटतें ! त्या रूपसागरांत कितीहि बुड्या मारल्या, तें प्रेमसंगीत कितीहि घोळघोळून म्हटलें तरी वेड्या जिवाची तृप्तिच होत नाहीं ! आणि जरी पुढील कार्यावर नजर देऊन मोठ्या कष्टानें आम्ही ह्या प्रेमळ प्रसंगांतून बाहेर पडत आहों तरी अंतरींच्या अंतरीं, ' मनाच्या मनाला ' त्याच्या रूपाचा, मुरलीचा, व प्रेमाचा छंद लागावा, त्या संगीतांत ह्या चित्तानें सैदव डुलत रहावें, तुकोबांच्या साध्या वाणींत बोलावयाचें तर " तुझा विसर न व्हावा " हेंच "दान" त्या दीनदयाळ " देवा " जवळ आम्ही अनन्य भावानें मागत आहों ! श्रीकृष्णाच्या चरित्राकडे निव्वळ ईश्वर ह्या दृष्टीनें पहा, किंवा निव्वळ मनुष्य ह्या दृष्टीनें पहा— प्रेमाचा गोड धडा तुम्हांला त्यांतून गिरवावयास मिळेल. पण श्रीकृष्णाच्या चरित्राचा समग्र उलगडा–इतर अवतारांप्रमाणेंच–श्रीकृष्णभगवान् हे साकार प्रभु होते, मानवदेहधारी चिच्छक्ति होती; दुष्टदलनार्थ " दोंवरी दो भुजा " घेऊन आलेली ती सगुण ईश्वरी मूर्ति होती असें मानलें तरच होणार आहे. एरव्हीं नाहीं.

शेवटीं ज्या " विश्वंभरानें " मज " पामरा " कडून हें चरित्र " बोलविलें, " ज्या " धन्या " नें आमच्या लेखनीरूपी " साळुंकी " च्या तोंडून पंचमांतील " मंजुळ वाणी " बोलवून तिच्याकडून आपलें सात्विक प्रेमानें डवरलेलें चरित्र गावविलें त्या विश्वंभर धन्याच्या—श्रीकृष्णाच्या—श्यामसुंदर कन्हय्याच्या–चरणीं त्याच्याच कृपेनें गायिलेलें हें चरित्र अर्पून तो तुम्हा सर्वांचें कल्याण करो असें चिंतून वाचकांची रजा घेतों.

। श्रीकृष्णार्पणमस्तु ।
। शुभं भवतु ।



‘ माले ’ चें पुढील पुष्प–

# लीला !

( स्वतंत्र सामाजिक कादंबरी )

जुलैच्या पहिल्या पंधरवड्यांत

प्रसिद्ध होईल.

महाराष्ट्र साहित्यसेवक ग्रंथमालेचें–

प्रथम पुष्प-

# कमला !



लेखक:–गं. रा. साने, बी. ए.

प्रस्तावनाकार:–प्रो. ल. ग. लेले, ( न्यू पू. कॉ. )

हृद्यगंम मांडणी, चित्तवेधक कथानक, मनोहर भाषाशैली, सुंदर नीत्युपदेश इत्यादिकांनीं सजलेली व वैवाहिक बंधनाचा यथास्थित विचार करणारी अशी ही स्वतंत्र सामाजिक कादंबरी आहे. एकदां वाचावयास घेतल्यावर शेवटपर्यंत खालीं ठेववणारच नाहीं! किं. १० आ. पण १ रु. प्रवेशफी भरून 'माले' चे कायम ग्राहक होणारास पाऊणपट किंमतीस मिळेल. तसेंच प्रथम व द्वितीय अशा दोन्ही पुष्पांची एकदम मागणी करणारास ट. ख. माफ. तरी नवीन वर्गणीदार होऊं इच्छिणारांनीं व इतर ग्राहकांनीं याचा अवश्य फायदा घ्यावा. मागविणेचा पत्ता:–

गं. रा. साने;

१२२ शुक्रवार, पुणें शहर.

# " कमले ' संबंधीं लोक काय बोलतात ?



" ज्ञानप्रकाश, " ता. २।८।२२:-

" विवाह ठरणें तो वधूवरांच्या संमतीनें व पसंतीनेंच ठरला पाहिजे ही गोष्ट सिद्ध करण्याचा लेखकांनीं या कादंबरींत प्रयत्न केलेला आहे. कादंबरी वाचनीय झाली आहे. "



" स्वराज्य "–२१।९।२२:-

" ही एक स्वतंत्र सामाजिक कादंबरी असून समाजहितदृष्ट्या या कादंबरीचा उपयोग विशेष होण्यासारखा आहे. "



रा. रां. गोविंद कृष्ण टिळक ( वकील, बार्शी ) आपल्या ( ता. २।८।२२ च्या पत्रांत लिहितात:-

" आपण आपली कादंबरी नजर म्हणून मला दिली त्याबद्दल मी आपला फार आभारी आहें.

पुस्तक वाचलें. तासभर चांगली करमणूक झाली. आपलें उद्दिष्ट कार्य यशस्वी होवो " इ.

" मुकुंदराय " कवि ऊर्फ मिरजकरशास्त्री ( शिक्षक नू. म. वि. पुणें ) यांचा अभिप्राय:-

श्री.

रा. रा. **गंगाधर रामचंद्र साने**, बी. ए., यांस:—

सा. न. वि. वि. आपण पाठविलेली 'कमला' कादंबरी मीं लक्षपूर्वक वाचिली. नित्याचे उद्योग संभाळून उरलेला वेळ आपण लेखनव्यवसायांत घालवीत आहां हें पाहून मला समाधान होतें. स्वतंत्र ग्रंथमाला काढण्याचा आपला प्रयत्न कोणाला बरें कौतुकास्पद वाटणार नाहीं ? पुस्तकाची भाषा चांगली आहे. प्रकरणेंही लहान लहान आटोपशीर असल्यानें वाचतांना कंटाळा येत नाहीं. कथानक साधेंच आहे. कांहीं ठिकाणीं मात्र " उत्तान वर्णनाची " झांक मारते ती नसती तर बरें. अनुभव येत जाईल तसतशीं आपलीं पुढील पुस्तकें अधिक उपयुक्त होतील असा मला भरंवसा आहे. कळावें, लोभ असावा, हे विनंति.

पुणें,
ता. २३।१।२३. } मु. ग. मिरजकर.